# नाकेबंदी

[ सामाजिक कादंबरी ]

र. गं. विद्वांस




* ३० *

मूल्य दीड रुपया

युद्धाला सुरुवात होतांच ज्या गोष्टी महाग आणि दुष्प्राप्य झाल्या त्यांत प्रवास आणि पुस्तकप्रकाशन या दोहोंचाही प्रामुख्यानें अंतर्भाव करायला कांहींच हरकत नाहीं. नाहींतर जवळ जवळ वर्षापूर्वी प्रसिद्ध व्हावयाच्या या छोट्याशा कथेला इतका वेळ प्रकाशांत यायला लागताच ना !

छपाईला लागणाऱ्या वस्तूंची महार्घता म्हणण्यापेक्षांही दुर्मिळता आणि प्रकाशनावर आलेले नवे नवे निर्बंध हेंच विलंबाचें प्रमुख कारण.

'मधाचें चोर' या माझ्या कथा-संग्रहाचें रसिकांनीं व वृत्तपत्रांनी भरपूर कौतुक केलें. 'नाकेबंदी' ही दीर्घकथाही त्यांना आवडेल असा विश्वास आहे.

प्रणयरम्य कॉलेज-जीवन यांत दिसणार नाहीं; तर एका सामाजिक प्रश्नावर मीं प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. यांतील काँग्रेस चळवळीच्या तारखा व स्थळ सोडल्यास बाकी सर्व प्रसंग व पात्रें काल्पनिक आहेत. जिवंत वा मृत व्यक्तींशीं त्यांचा तोंडावळा ताडून पाहाण्याचा 'अव्यापारेषु व्यापार' कोणीं करूं नये, हीच विनंती.

र. गं. विद्वांस

*२८०/३ सदाशिव पेठ, पुणें २.*

# १

गाडी वेगानें पुढें धावत होती. गाडी आणि गाडीबरोबर कावेरीचें शरीरही. आणि मन ! दोरी तुटून हवेंत गोते खाणाऱ्या निराधार पतंगाप्रमाणें कोठेंतरी भटकत होतें. गाडीचा खडखडाट, बाहेरच्या अंधारांतून येणारा रातकिड्यांचा विचित्र ध्वनि नि उतारूंचीं आपसांत चाललेलीं बोलणीं यांनीं केवढी गडबड होत होती. शारदा नाटकांतल्या म्हाताऱ्या–बहिऱ्या भुजंगनाथानेंही म्हटलें असतें, ‘ अरे काय हा गलका ? ’ पण कावेरीचें कशाकडेच लक्ष नव्हतें. भयंकर अपघातांतून वांचलेल्या व्यक्तीला कांहीं काळ आपल्यावरचें संकट नाहींसें झालें आहे, हें खरेंच वाटत नाहीं. आणि सभोवतालीं दिसणारें दृश्यमान जग, खरें कीं खोटें याचा तिला विसर पडतो. कावेरीचें तसेंच झालें होतें. त्या संमिश्र गोंगाटांतही आपल्या छातीचे ठोके अगदीं स्पष्ट पडतांना तिला ऐकूं येत होते. जणूं तिच्या मनांतली भीति ते अधिक स्पष्ट करीत होते. एकवार आपल्या धडधडणाऱ्या छातीवर हात ठेवून तिनें सगळीकडे पाहिलें. तिला ओळखणारें कोणीच नव्हतें डब्यांत. पण तरीही तिला वाटत होतें, आपण पुण्याकडे जाणाऱ्या गाडींत आहोंत हें खरें आहे काय ? का हा नुसता भासच आहे ?

पुन्हा एकदां तिनें डब्यांत नजर टाकली. ओळखीचें कोणीच नव्हतें हें किती बरें होतें ? एका दृष्टीनें बरें होतेंही नि नव्हतेंही. वास्तविक त्या वेळेस ती मनाच्या अशा विचित्र अवस्थेंत होती, कीं कोणी ओळखीच्या स्त्रीनें आपुलकीनें तिच्या पाठीवर हात ठेवून तिचा दुःखभार हलका केला असता, तर खचित तशा तऱ्हेची सहानुभूति तिला हवी होती. पण न जाणो ! अशी एखादी स्त्री असती आणि तिनें सहानुभूति दाखविण्याऐवजीं उलट तिला विचारलें असतें, “ कावेरी ! इतक्या रात्रीं पुण्याला जाणाऱ्या या गाडींत तूं एकटी कशी ? यजमान, दीर, कोणीच कसे नाहींत ? ” तर मात्र त्या प्रश्नाचें उत्तर देणें तिला फार जड गेलें असतें. सांत्वन करणारें कोणी नसलें तरी

चालेल पण रिकामटेकड्या चौकशा करणारें कोणी नव्हतें ह काय थोडें होतें ? नाहीं तर त्यांच्या प्रश्नाला ती काय उत्तर देणार होती ? स्वतःच्या अब्रूचा बचाव करण्यासाठीं ती सासरहून पळून चालली होती, यावर कोणीं विश्वास ठेवला असता ? उलट ऐकणाऱ्या व्यक्तींनीं तिलाच दोष देऊन म्हटलें असतें, " छे ! भलतंच ! आम्हांला नाहीं खरं वाटत ? इनामदारांच्या घरीं असं कांहीं होईल, अशी कल्पनासुद्धा करवत नाहीं. तुझंच कांहीं तरी काळंबेरं असलं पाहिजे ! "

श्रीमंत कोणतेच गुन्हे करीत नसतात. त्या दृष्टीनें तिच्या अंगावर हात टाकणारा तिचा दीर निर्दोषीच होता. वेड्या भावाच्या ऐन तारुण्याच्या बहरांत असलेल्या अनाघ्रात पत्नीवर दिरानें नाहीं हात टाकायचा तर कोणीं ?

तिच्या धाकट्या दिरानें काढलेले उद्गार तिला पुनःपुन्हा आठवत होते. " वहिनी ! कशाला त्रागा करितां ? तुमचा नवरा, माझा थोरला भाऊ, केशव, वेडा आहे हें तुम्हांला आधीं कळतं तर तुमच्या वडिलांनीं तुमचं लग्न माझ्या भावाशीं लावलं नसतं असं का वाटतं तुम्हांला ? वहिनी ! पैसा बोलतो आहे बरं ! पैसा ! तुमच्या वडिलांचं कर्ज फिटलं ; माझ्या भावाला लौकिकदृष्ट्या बायको मिळाली ; घराण्याची अब्रू राहिली ; संपलं ! कशाला वाईट वाटून घेतां ? मी आहे ना ? भावाचं नांव नि माझं गांव ! "

दांतखिळी बसविणारा तो प्रसंग तिच्या डोळ्यांपुढून किती वेळ तरी हलत नव्हता. एंजिनमधून निघणाऱ्या विस्तवाच्या लाल लाल ठिणग्यांप्रमाणें तिच्या मस्तकांत विचारांचा प्रक्षोभ सुरू झाला होता. त्या दाहक प्रसंगाची स्मृति असह्य होऊन तिनें डोळे घट्ट मिटून घेतले. पण म्हणून ती स्मृति नाहींशी होणार होती थोडीच ?

संध्याकाळीं सासरीं घडलेल्या त्या विचित्र प्रसंगाचीं भुतें तिला भेडसावीत होतीं. कोळसे काढण्यासाठीं म्हणून ती लाकूड-फाटा ठेवावयाच्या खोलींत गेली होती. वास्तविक तें काम गड्यानेंच करायचें, पण घरांत कोणीच नव्हतें. आबासाहेब कोठें शेतावर गेले होते. तिचा नवरा केशव, नेहमींप्रमाणें खोलींत पडला होता. वृद्ध मावस-सासूबाई गांवांत रामाच्या देवळांत पुराणाला गेल्या होत्या आणि चंदूभावजी ? नेहमींप्रमाणें मित्रांबरोबर गांव धुंडीत होते.

त्या दिवशीं कावेरी न्हायली होती आणि तीही जराशा उशीरानेंच. तिचे केस मोठे, लांबसडक नि मऊ होते आणि न्हायल्यानंतर पाठीवर मोकळे टाकले म्हणजे तर ते तिच्या किंचित् चिंचोळ्या, काळसर पण कमालीच्या आकर्षक चेहऱ्याला फारच मोहक दिसत. तिचें लग्न होण्यापूर्वी न्हायल्यानंतर केस मोकळे टाकून एखादे वेळेस ती मैत्रिणींकडे गेली, म्हणजे त्या म्हणायच्या देखील, "कावेरी! तूं दिसायला चांगली आहेसच. पण तशी नसतीस तरी तुझ्या केसांवर मोहित होऊन कोणीही श्रीमंत माणूस हसत तुझ्याशीं लग्न करील."

त्या लांबसडक केसांकडे पाहिल्यावर मैत्रिणींच्या त्या बोलण्याची तिला आठवण झाली आणि ती स्वतःशीं म्हणालीसुद्धां, "मी श्रीमंत माणसाची सौभाग्यवती झालें खरीच! पण......"

घरांत कोणीच नसल्यामुळें व मग रात्रीं धावपळ नको, या हेतूनें कोळसे काढण्यासाठीं म्हणून लाकूड-फाटा ठेवण्याच्या खोलींत ती गेली होती. छताला ठिकठिकाणीं कोळ्यांचीं जाळीं लटकलीं होतीं. आणि बरींच वर्षे तेथें लाकूड-फाटा सांठविण्यांत येत असल्यामुळें एक प्रकारचा कुबट वास येत होता. पुढें पुढें येणारे केस तिनें एका हातानें एकेरी गांठ देऊन बांधले आणि दुसऱ्या हातानें ती पोत्याचें तोंड उघडूं लागली. कौलाराला असलेल्या एका झरोक्यांतून तिरपा येणारा उन्हाचा झोत तिच्या नितळ चेहेऱ्यावर पडला होता. त्या दिवशीं हवेंत किंचित् उष्मा होता आणि न्हायल्यामुळें तिला तो विशेषच जाणवत होता. उन्हाचा ताप असह्य झाल्यानें ती किंचित् मागें झाली. पण त्याबरोबरच पायापाशीं पडलेल्या एका लाकडाचें कुसळ टचकन तिच्या पायांत गेलें. स्स....! हाय!! असा एक दुःखोद्गार स्वतःशींच काढून ती खालीं वाकली. आणि त्याबरोबरच कसा तरी एकेरी गांठविलेला तिचा सारा केश-संभार ओघळून तिच्या छातीवर रुळूं लागला.

हलक्या हातानें तिनें पायांतलें कुसळ काढून टाकलें नि सहज मागें पाहिलें.... ... ... आणि ... ... सरावाच्या जागीं विश्वासानें पाऊल ठेवावें नि पायांखालीं प्रचंड भुजंग दिसावा तसें तिला झालें.

तोंडांतल्या सिगरेटचा धूर सोडीत तिचा दीर चंदू दारांत उभा होता. चंदूला ती नव्यानें पाहात होती असें थोडेंच होतें? मागें आलेल्या दोन चार अनुभवांपासून ती त्याला टाळीतच असे. सुखवस्तूपणामुळें त्याचें तें आडवें तिडवें सुटलेलें शरीर; सोन्याच्या गुंड्या असलेला आंगांतला रेशमी शर्ट, उलटे फिरविलेले केस, नि हातांतली जळती सिगरेट...या सर्वांपेक्षांही भेदक असें कांहीं वाटलें असेल तर तें त्याचे डोळे....

कांहीं क्षण ती त्याच्याकडे वेड्यासारखी पाहात भांबावलेल्या स्थितींत उभी होती. तिच्या डोक्यांत एकच विचार नाचत होता, " चंदू इथें कसा ? "

तिनें स्वतःला सावरीत म्हटलें,

" कोण ? चंदूभावजी ? काय हवंय तुम्हांला ? "

कांहीं वेळ तो तिच्याकडे पाहात होता. पण मग मोठ्यानें हसत नि सिगरेटचा एक लांबलचक झुरका घेत त्यानें म्हटलें,

" दुसरं काय? वेड्या भावाची शाहाणी बायको. तुझें लग्न होऊनही तूं अद्याप कुमारीच आहेस. प्रीतीचं असलं अनाघ्रात पुष्प............ "

" काय बडबडताय वेड्यासारखं ! माझं नशीब काढतें आहें मी ! दूर व्हा ! तुम्ही......जा...... "

" दूर जाऊं ? छट् ! आल्या दिवसापासून हवी असलेली गोष्ट मिळत असतांना दूर जाऊं ? " हळू हळू एक एक पाऊल टाकीत तो जवळ येत होता.

जास्तच भेदरून कावेरीनें म्हटलें, "दूर व्हा! काय विचार आहे तुमचा? मी ओरडीन मोठ्यानं ! मामंजी येतील नि............"

पण त्या धमकावणीनें घाबरून जाण्याऐवजीं चंदू आणखी मोठ्यानें हसला आणि आणखी जवळ येऊन हलकेंच पण दरडावणीच्या आवाजांत त्यानें म्हटलें, " कुणाला दम देतेस आबांचा! वेडी ? त्यांच्याच संमतीनं मी.......... "

प्राजक्ताच्या झाडाखालीं उभें राहिल्यानंतर फुलांऐवजीं निखाऱ्याची वृष्टि व्हावी तसें तिला झालें. आबांच्याबद्दल तिचें स्वतःचें चांगलें अगर वाईट कांहींच मत झालें नव्हतें. पण तसें दोष देण्यासारखें तिला त्यांच्यांत कांहींच

दिसलें नव्हतें. एक प्रकारचा आधार वाटे तिला, पण तेच आतां.........
विश्वास न बसून तिनें म्हटलें,

" काय सांगताय हें भलतंच ? "

" काय सांगतोंय ? मूर्ख मुली ! तुला काय वाटलं मी चेष्टा करतोंय ? केशवचं वेड जगाला दिसूं नये म्हणून त्याचं लग्न करून तुला घरांत आणली. हो ! आम्हां इनामदार लोकांना अब्रूला भ्यावं लागतं. तुला आतां पुत्ररत्न नको ? आज रात्रीपासून तुझी व्यवस्था माझ्या........."

" हाय ! " असा एक दुःखोद्गगार काढून ती खालीं बसली. पळून जावें असें तिला वाटत होतें. पण पायांतला जोम पार नाहींसा झाला होता.

चंदूनें तिचा हात धरण्याकारितां म्हणून हात पुढें केला नि हलकटपणें हसून म्हटलें,

" पण मींच विचार केला, इतका उशीर कशाला ? अमृतप्राशनाला...'.

शब्द कृतींत उतरायला लागणार असें दिसतांच ती भानावर आली तिला कोठली शक्ति आली होती कोण जाणे ? त्याच्या हातांतला हात तिनें खसकन ओढून घेतला. त्या भरांत हातांतली बांगडी वाढवून तिची काच तिच्या हातांत घुसली होती नि त्यांतून भळ भळ रक्त वाहात होतें तिकडेही तिचें लक्ष नव्हतें.

तिनें तडक दार गांठलें नि ओरडून म्हटलें,

" खबरदार एक पाऊल पुढें याल तर ? मला फसवून माझं लग्न केलंत. आतां अब्रूनं जगूं द्यायचाही विचार नाहीं का तुमचा ? "

आणि तशीच ती बाहेर आली.

संध्याकाळच्या सावल्या आंगणांत आल्या होत्या. मनाला प्रसन्न करणारें गार गार वारें सुटलें होतें. पण चंदनाचा लेप दिला असता तरी तिच्या आंगाचा दाह कसा शांत झाला असता ? तिनें तडक आपली खोली गांठली. अद्याप घरांत कोणीच आलें नव्हतें. पुन्हा चंदूभावजी मागें मागें आले तर करायचें तरी काय, हा प्रश्न होताच. बाहेरच्या दाराशीं चंदू मोठ्यानें म्हणत होता, " मी जातों आतां ! पण पाहूं या कुठवर मस्ती चालते ती ? रात्रीं तूं आहेस नि मी आहें........."

खोलीचें दार तिनें धाडकन लावून घेतलें आणि वळकटीच्या ढिगाऱ्यांत तोंड घालून ती रडूं लागली. दुसरें काय करणार होती ? नि कोण ऐकणार होतें ?

काय करायचें ? केवढा प्रश्न होता ? आणि कावेरीसारख्या खेड्यांत वाढलेल्या एका आशिक्षित मुलीनें तो कसा सोडवायचा ? त्या घरांत राहाणें धोक्याचें होतें. रात्रीं काय होणार होतें कोण जाणे ? आणि तसें झालेंच तर ? वेड्या नवऱ्याची पत्नी नि उर्मट दिराची रखेली...म्हणून राहाण्यापेक्षां जीव दिलेला काय वाईट ?

पण जीव असा सुखासुखी थोडाच देतां येतो ? आणि जीव दिला तरी त्याचें इनामदार मंडळींना काय होतें ! कावेरीवरच कांहीं तरी बालंट आणून ते आपली अब्रू साफ करूं शकले असते. जीव तरी काय म्हणून द्यायचा ? मग काय करायचें ? ज्या घरांत दीर वहिनींचें नातें मानीत नाहीं; ज्या घरांत सासऱ्याला सुनेच्या शीलाचें मोल वाटत नाहीं; तें घर कसलें ? त्यापेक्षां जावें ! पळून जावें ! या घरांतून दूर जावें ? बाहेरच्या जगांत कितीही अडचणी असल्या तरी असला 'कोंडमारा' तरी सहन करावा लागणार नाहीं.

पण पुन्हा प्रश्न उभा राहिला. जाऊन कुठें जायचें नि काय करायचें ? बाहेर पडल्याबरोबर नोकरी करायला ती शिकलेली थोडीच होती ? जेम तेम मराठी चार इयत्ता झाल्या होत्या. इतर पुस्तकें ती खूप वाची पण असें काय तिचें वाचन नि ज्ञान होतें, कीं त्या जोरावर बाहेरच्या जगांत तिला किंमत यावी ?

काय वाटेल तें होवो ! या घरांत पाणी प्यायचें नाहीं असें तिनें ठरवलें. तिच्याजवळ घरून निघतांना वडिलांनीं थोडेसे पैसे दिले होते. ते तिनें मोजून पाहिले. जेमतेम पंधरा वीस रुपये होते. इतक्या थोड्या रकमेंत काय होणार ? फार तर पुण्याला जातां येईल. नाहीं म्हणायला तिची एक मावशी पुण्याला होती. लग्नानंतर आठच दिवसांनीं जेव्हां प्रथम ती पुण्याला गेली होती तेव्हां तिच्याकडेच उतरली होती. पण तिची बदली पुण्याहून दुसऱ्या ठिकाणीं झाल्याचें तिच्या वडिलांच्या पत्रांतून तिला कळलें होतें.

घरांत अद्याप सामसूम होतें. दिवे लागणी व्हायला आली होती. सासऱ्याची गाडी शेतावरून यायला फारसा अवधी नव्हता. 'आपण लवकर हललों नाहीं तर मोठा अनवस्था प्रसंग येईल' हें तिला माहीत होतें. पुण्याला जाणारी गाडी त्या गांवापासून मैलभर लांब असलेल्या छोट्याशा स्टेशनवरून रात्रीं आठाला सुटत असे.

एका पिशवींत तिनें दोन लुगडीं नि कांहीं पोलकीं भरलीं. देवघरांतल्या देवाला लवून भक्तिभावानें नमस्कार केला. कपाळाला कुंकू लावून घेतलें नि मागच्या दारानें झपाझप पावलें टाकीत तिनें स्टेशनचा रस्ता धरला.

घराबाहेर पडतांना तसल्या त्या परिस्थितींतही तिला वाटत होतें, या घराची मालकीण म्हणून आलेली मी, एक त्यक्ता म्हणून बाहेर पडत आहे. काय हें दैव ! आणि ती स्टेशनवर पोचली, तीही असल्या विचारांतच.

गाडी यायला अद्याप अवकाश होता. प्लॅटफॉर्मवर फारशी गर्दीही नव्हती. हा एक योगायोगच होता. पण तरीही तिला स्वतः जाऊन तिकीट काढणें शक्य नव्हतें. इनामदारांच्या वेड्या केशवची शाहाणी बायको म्हणून सारा गांव तिला ओळखत होता. ती तिकीट काढायला गेली असती नि कोणीं कांहीं विचारलें असतें तर ?

आसपासच्या कोणत्यातरी खेड्यांतल्या शेतकरी बायका पुण्याला जाण्यासाठीं म्हणून प्लॅटफॉर्मवर एका बाजूला बसल्या होत्या. त्यांचीं तीं गांठोडीं, गलिच्छ कपडे नि सारखें तपकीर ओढणें यांची तशा स्थितींतही तिला गंमत वाटली. त्या बायकांचीं आपापसांतलीं बोलणीं सोडलीं तर सारा प्लॅटफॉर्म कसा शांत होता ! बाकी गजबजाट असायला असें काय मोठें स्टेशन होतें तें. सकाळीं दहा नि रात्रीं आठ या दोन वेळेला जाणाऱ्या पॅसेंजर गाड्या नि दोन गुड्स ट्रेन्स सोडल्या तर त्या स्टेशनच्या प्लॅटफॉर्मला गाडीचा संपर्क होत नसे. आणि आज तर नेहमींपेक्षांही कमी गर्दी होती. एक कुलुंगें कुत्रें रुळावर पडलेला भाकरीचा तुकडा चघळीत होतें. दोन पोर्टर्स स्टेशनमास्तरच्या खोलीपासून जराशा अंतरावर गप्पा मारीत उभे होते नि एकुलत्या एका दिव्याखालीं एकजण कसलेंसें स्तोत्र अर्धवट म्हणत होता.

कावेरीला हवें होतें तसेंच सारें वातावरण होतें. तिनें आपसांत गप्पा

मारणाऱ्या त्या शेतकऱ्यांच्या बायकांपैकीं एकीजवळ जाऊन विचारलें, "माझं पुण्याचं तिकीट काढतां का ?"

'एवढी बामणाची शिकलेली बाई ! नि आपल्याला कां सांगते तिकीट काढायला !' अशा तऱ्हेनें तिच्याकडे पाहात त्या बाईनें म्हटलें,

"आँ ? तुझं तिकीट मी काढूं व्हय ? तुला काय झालंय ?"

प्रसंग माणसाला शाहाणा करतो खरेंच. पायाच्या घोट्यावर हात ठेवीत किंचित् दुःखद स्वरांत कावेरीनें म्हटलें, "पाय मुरगळलाय माझा आजीबाई ! नाहीं तर कशाला त्रास दिला असता तुम्हांला...?"

पायाचें निमित्त खरें वाटल्यामुळें असो अगर आजीबाई म्हटल्यामुळें असो म्हातारीनें तिला तिकीट काढून आणून दिलें खरें. गाडीही आली नि एका डब्यांत कावेरीनें आपला देह घुसवला.

बाप रे ! कोण खेचाखेच झाली होती प्रत्येक डब्यांत ! मागच्या स्टेशन-वरूनच गाडी पूर्णपणें भरून आली होती. पण स्टेशनवर फारशी गर्दी नसल्यामुळें व सामानही फारसें नसल्यामुळें तिनें एका डब्यांत स्वतःचा शिरकाव करून घेतला. एका म्हातारीजवळ थोडीशी जागा होती तेथें ती बसली आणि मग गाडी सुरू झाल्यावर मात्र तिला वाटलें, 'झालें ! आतां आपण एकल्या, अगदीं एकल्या, या जगांत ! उद्यां ! उद्यां कशाला ? आज ! आज रात्रींच घरीं नि उद्यां सकाळीं साऱ्या गांवांत होईल, इनामदारांची तरणीताठी सून घरांतून पळून गेली.'

खरेंच ! घरांतून पळून गेली ! कां पळून लावली तिला ! पण जगाला कोण सांगणार समजावून ! आणि कोण विश्वास ठेवणार ? न ठेवेना ! ती जोंपर्यंत मनानें शुद्ध होती तोंपर्यंत जगाच्या स्तुतिनिंदेची काय म्हणून पर्वा करावी तिनें ?

गाडींत पाऊल टाकल्यानंतरही तिच्या मेंदूतलें विचारांचें वादळ थांबलें नव्हतें. चंदूनें उच्चारलेले ते शब्द आंगाला टाचण्या टोचल्याप्रमाणें तिला आठवत होते, 'वहिनी ! पैसा बोलतो आहे. आमच्या केशवला बायको मिळाली, तुमच्या वडिलांना पैसा मिळाला !'

बाप इतका नीच होईल काय ? कोणीं सांगावें ! वास्तविक वडिलांकडे जावें असें तिला वाटत नव्हतें थोडेंच ! किंबहुना लग्नानंतर वडिलांना तिनें

ज्रीं दोन तीन पत्रें पाठविलीं होतीं त्यांत तिनें लिहिलें होतें, " मी आनंदांत आहें. सासरचीं सारीं माणसें चांगलीं आहेत. काळजी करूं नका ! " तिला वाटे, ' कशाला वडिलांना दुखवा ! कळेल खरी स्थिति तेव्हां कळेल ! '

पण चंदूनें उच्चारलेले शब्द ऐकून मात्र तिचें मन साशंक झालें होतें. आपले वडील असें करतील ? हो ! कदाचित् माईच्या सल्ल्यानें ......जो पैशाकरितां मुलीचा बळी.........

तिला विचारच करवेना. समोरच्या बाकावर बसल्या बसल्याच झोपेचा ब्रह्मानंद अनुभवणाऱ्या एका बाईनें डोकें नीट टेकतां यावें नि गार वारें लागूं नये म्हणून खिडकीचें काचेचें दार लावून घेतलें होतें आणि त्या काचेंत कावेरीला आपलें प्रतिबिंब पूर्णपणें दिसत होतें. किंचित् फराटा गेलेलें कुंकूं सारखें करतांना तिच्या मनांत विचार आला, ' कशाकरितां नि कुणाकरितां जपायचं मी या कुंकवाला ! ज्यांच्याकरितां सारं करायचं, ज्यांच्या जिवावर स्वतःचं मोठेपण मिरवायचं, तेच जर......, कोणीं तरी तिला डिवचून म्हटलें, " ए बया ! जरा नीट बस ना ? चेहेरे मोहरे बघतीयास समोरच्या आरशांत जनू ! महालांत न्हाईस, आगिनगाडींत हैस. नीट बस जरा ! "

मुकाट्यानें कावेरी नीट बसली. त्या बाईची तरी काय चूक होती ? तिनें कितीही म्हटलें असलें तरी महालांत बसण्याचें सुख कावेरीला कसें अनुभवितां येणार होतें ?

कोणतें तरी स्टेशन आल्यामुळें गाडी थांबली. गाडी आणि गाडीबरोबर कावेरीची विचारमालिकाही ! आपला पदर तिनें सारखा केला नि पुन्हा ती समोरच्या काचेंत पाहूं लागली. घाईघाईनें कसेतरी बांधलेले केस, डोळ्यांवर नि कपाळावर आले होते. गाल बसल्यासारखे वाटत होते नि डोळे किती लालभडक झाले होते. काळजीनें केवढा फरक पडतो माणसांत ! संध्याकाळची आकर्षक, मोहक कावेरी, कोठें नाहींशी झाली होती ! काचेंतल्या प्रतिबिंबाला बोलतां येत असतें तर त्यानें ओरडून सांगितलें असतें,

" कावेरी ! काय पाहातेस अशी नवऱ्यासारखी ! कोण विचारणार तुला ? शिक्षण नाहीं, कला नाहीं, किती त्रास पडला तुझ्याबाबत तुझ्या वडिलांना ?

चल ऊठ ! घरीं जा ! सासराशिवाय स्त्रीला आधार नाहीं. नवऱ्याचा आसरा सोडून आलेल्या बाईला ब्रह्मदेवसुद्धा जवळ करूं शकत नाहीं."

आपल्या त्या म्लान चेहेऱ्याकडे तिला पाहावेना. किती वेळ गाडी उभी राहाणार होती कोण जाणे ! टीचभर जागेंत बसून बसून तिला खोड्यांत पडल्यासारखें झालें होतें. गार वारा आणि उतारू यांना प्रतिबंध म्हणून डब्यांतल्या बहुतेक खिडक्यांचीं तावदानें बंद होतीं. नि जागा सापडेल तेथें माणसें बसलेलीं अगर उभीं होतीं. बरें ! तीं तरी चांगलीं होतीं का ? छे ! सारा तिसरा वर्ग. कितीतरी दिवसांत पाण्याचा स्पर्श न झालेले कपडे. वचावचा चाललेलें बोलणें नि त्यांच्या शरिरांतून निघणाऱ्या घामाचा दुर्गंध. कावेरीला मळमळल्यासारखें होऊं लागलें. समोरची खिडकी उघडल्यास वारा येऊन बरें वाटेल म्हणून ती त्या खिडकीजवळ गेली. मघाशीं तिला शाहाणपणा शिकविणारी बाई खिडकीच्या काचेच्या तावदानाला टेकून झोपली होती. कावेरीनें जाळीला हात घालीत त्या बाईला म्हटलें, "जरा बाजूला होतां ? मला खिडकी उघडायची आहे."

त्या बाईच्या कानाचे पडदे बरेच जाड असावेत असें दिसलें. दोन वेळां सांगूनही तिनें कांहींच हालचाल केली नाहीं. अखेरीस कावेरीनें तिला किंचित् हालवली. निद्रिस्त ज्वालामुखी एकाएकीं जागृत होऊन त्यामधून बाहेर पडणाऱ्या अग्नीनें आसपासचें वातावरण गरमागरम होऊन जावें तसाच कांहींसा प्रकार घडला. ती बाई जागी झाली ती जवळ जवळ ओरडतच. आपली झोप मोडल्याबद्दल तिनें कावेरीची हजेरी तर घेतलीच, पण इतरांची सहानुभूति मिळावी म्हणून म्हटलें,

"मोठी श्येनी बाई तूं ! नि गाडी उभी राह्यच्या वक्ताला दार उघडतियास तवा आतां तुला काय म्हनूं ! पासिणजर आंत आल तर तुझ्या डोस्क्यावर बसल का माझ्या ? का व दादा ? "

शेवटचे शब्द ती ज्या एका शेजारच्या म्हाताऱ्याला उद्देशून म्हणाली होती, त्यानें पायांपाशींच पचकन् तोंडांतला 'रस-विमर्श' टाकला नि जीर्ण मुंडाशाच्या शेवानें कपाळावरचा घाम पुशीत म्हटलें, "तर ! पासिणजर काय राहातील व्हय ? जरा कुठं उघडं दिसलं कीं सारलंच त्यांनीं आपलं आंत ! हां ! ह्ये घंटा झाली नव का ? हालल आतां गाडी. "

घणाऽऽण् घणाऽऽऽण् असे घंटेचे टोले पडले. गार्डाच्या तोंडांतली शिटी वाजली. एंजिनच्या दिशेनें हिरवा प्रकाश पाडण्यांत आला नि संथपणें निवणाऱ्या श्रीमंत बाईच्या थाटांत गाडीनें स्टेशन सोडलें.

कावेरीनें समजुतीच्या स्वरांत म्हातारीला म्हटलें, " मला जरासं मळमळल्या-सारखं होतंय म्हणून उघडली खिडकी मीं ! राहूं दे ना ? हवा येईल जरा ! "

" आँ ! आतां म्हनूं तरी काय तुला ? " गाडी सुरू झाली होती तरी त्या खडखडाटांतही म्हातारीचे शब्द मोठ्यानें ऐकूं येत होते. " ए श्येन्या बाई ! गार गार वारं लागलं तर काय बरं व्हईल व्हय ? उन्धां शिक पडलें तर डागदराकडे जाया तुझ्यावानी पैशेवाली हाय व्हय मी ! येवढा षोक करायचा व्हता तर बसायचं व्हतंस शिकंड कलासांत रानीवानी ! मगा मी पाणी प्याया उतरले व्हते ना मागल्या ठेशनावर......... "

म्हातारीबद्दल आलेला राग तात्पुरता बाजूला ठेवून ' ही काय सांगणार ? ' या नव्या उत्सुकतेनें कावेरीनें तिला म्हटलें ' हं ! बरं मग ! त्याचं काय ? "

" त्याचं काय ? तवां शिकंड कलासांत तुझ्यावानीच एक आवा होती नि एक बाप्या होता. माऽऽरे जाळींतून तोंड काढून पाहात होती बाहेर नि येस् फयेस् करीत व्हती त्या बाप्यासंग ! अशी नटली व्हती, अशी नटली व्हती; जणूं शिणिमांत नाचतिया; नि तो बाप्याही लई ऐटबाज व्हता. तोंडांतन निसता इंजिनावानी धूर टाकीत होता. त्यानं काय क्येलं, सवता शिग्रेट ओढली नि त्या आवाला म्हटलं, ' घ्ये ! पघ तर कशी हाये ! ' नि तिनं बी टवळीनं घेतलीन् कीं त्याच्या हातांतन नि ' फू फू ' करून वढली शिग्रेट ! '

शेवटचीं वाक्यें म्हातारीनें अशीं कांहीं अभिनय करीत सांगितलीं, कीं त्यामुळें डब्यांतील श्रोतृवृंदांत एकच हशा पिकला. इतका वेळ बाका-खालच्या टीचभर जागेंत झोपेची तंद्री लावणाऱ्या एका उतारूनें डोळे किंचित् किलकिले करीत विचारलें, " आर इच्या ! काय झालं व्हं ! "

पण त्याला कोणींच उत्तर दिलें नाहीं. डब्यांतील हास्यलहरी ओसरल्या नि श्रोत्यांपैकीं एकानें म्हटलें, " अजब आहे बुवा ! बाई सिगरेट ओढीत होती नि नवरा आग्रह करीत होता ! शाबास ! "

" अहो ! असेल कोणी सिनेमांत नाचणारी ! " दुसऱ्यानें साथ दिली.

" न्हाईतर नवऱ्याला सोडून आपल्या जाराबरोबर पळून जाणारी ! " म्हातारीनें पुष्टी दिली.

पुन्हा एकदां डब्यांत हास्याची लकेर पसरली नि विरली. जो तो पूर्ववत् शक्य त्या मार्गानें निद्रादेवीची आराधना करूं लागला नि त्या वृद्ध बाईनेंही किंचित् बाजूला होऊन आपलें निद्रेचें आख्यान मागील अंकावरून पुढें चालू केलें.

आणि इतका वेळ आंतल्या बोलण्याकडे लक्ष देणाऱ्या कावेरीनें तोंड काढून पुन्हा बाहेर पाहिलें. गार गार वारें आंगाला झोंबत होतें. बराच वेळ गळ्याभोवतीं असलेला पदर कावेरीनें डोक्यावरून घेतला. कान झाकले गेल्यामुळें तिला तितकेंच बरें वाटलें. कपाळावर नाचणाऱ्या बटा तिनें डाव्या हातानें मागें सारल्या नि वर आकाशाकडे सहज नजर टाकली.

सारें आकाश कसें निरभ्र होतं. स्वर्गांतल्या पुण्यवान् गोष्टी नि चेहेरे मानवाला दिसूं नयेत म्हणूनच जणूं काय स्वर्गाच्या दारावर निळा पडदा टाकण्यांत आला होता. ती शुद्ध पक्षांतली पंचमी होती. चंद्र केव्हांच अस्तमान झाला होता नि असंख्य तारे चमकत होते. तारकांच्या त्या अंधुक प्रकाशांत नजरेसमोरून झपाट्यानें धावत जाणारीं झाडें, शेतें नि माळरानें पाहाणाऱ्याच्या मनावर एक प्रकारचा गूढ ठसा उमटवीत होतीं. तिच्या मनांत आलें, " गेलीं कित्येक वर्षें रोज न चुकतां गाडी या मार्गानें जात असेल. या अचल सृष्टीच्या नजरेखालून गाडीच्या कितीतरी खेपा झाल्या असतील, होतील, पण त्यांचें या स्थिर सृष्टीला काय? किती नाना प्रकारचे उतारू या गाडीनें जात असतील. कोणी तरी अत्यवस्थ असल्याची तार आल्यामुळें कोणी जात असतील, तर कोणी पुत्रप्राप्ती झाल्याची शुभवार्ता कानीं पडल्यामुळें प्रवास करीत असतील. कोणाला हजारांचा सौदा पटवायचा असेल तर कोणी सावकाराचें तोंड चुकविण्यासाठीं निघाला असेल. एखादें नूतन विवाहित जोडपें स्वर्गीय प्रेमाचा दिव्यानंद अनुभवीत दुसऱ्या वर्गांतून प्रवास करीत असेल तर लग्नानंतर अल्पावधींतच नवऱ्याला, सासरच्या मंडळींना नि संसाराला विटल्यामुळें घरीं न कळवितां पळून जाणारी माझ्यासारखी एखादी असहाय, तरुण स्त्रीही असेल.........."

त्या विचारासरशीं तिच्या अंगावर विलक्षण शहारे आले. ज्या गाडीनें विवाहानंतर आपण प्रथम दिमाखानें पुण्याला गेलों होतों त्याच गाडींतून पळून आलेली एक असहाय स्त्री, म्हणून आपण पाय ठेवणार! किती विचित्र परिस्थिति होती ही? विचित्र आणि शोचनीयही!

विचाराच्या अतिरेकानें डोकें सुन्न होऊन जड झाल्यासारखें वाटल्यामुळें तिनें तोंड आंत घेतलें. खिडकी बंद केली आणि तावदानाच्या काचेवर डोकें टेकलें.

पुण्याचें स्टेशन यायला अद्याप बराच अवकाश होता. सकाळ होईल, पुणें येईल, पण करायचें काय पुण्यांत जाऊन? मावशीही नसल्यामुळें पुण्यांत हक्कानें उतरतां येईल असें कोणीच नव्हतें. मग पुण्याला जायचें काय कारण होतें? एकदाच काय ती पुण्याला आली होती ती! मग? पण गाडी अखेरीस उभी राहाणार होती पुण्यालाच आणि इतर शहरांच्या मानानें अफाट पसरलेलें पुणेंच तिला बरें वाटलें.

नाहीं म्हणायला पूर्वीं ती ज्या आपल्या मावशीकडे उतरली होती त्या मावशीच्या बिऱ्हाडाजवळ तिची एक मैत्रीण राहात होती. मिळवता आनंदी नवरा नि छोटासा, गोड हसरा छोकरा, हा आपल्या मैत्रिणीचा रम्य 'चिमुकला संसार' पाहून तिला वाटलें होतें, "एक दिवस आपणही असाच संसार थाटूं! असाच! यापेक्षांही दिमाखदार! इनामदारांची पत्नी आहोंत आपण! मैत्रिणीच्या नवऱ्यासारख्या एखाद्या कारकुनाची नाहीं!"

मैत्रिणीनें तिला विचारलें होतें, "कावेरी! लग्न झालं म्हणे तुझं? बरं झालं बाई! इनामदार आहेत ना यजमान? नुसते नांवाचे नाहींत कांहीं! खरोखरीच श्रीमंत आहेत म्हणे! अग! आम्हांला नुसतं आमंत्रण तरी द्यायचंस?"

पण कावेरीनें जेव्हां तिला आपलें लग्न एका लहानशा खेडेगांवीं फारसा गाजावाजा न करितां एका दिवसांत उरकून घेतल्याचें सांगितलें, तेव्हां तिच्या मैत्रिणीनें जरासें आश्चर्य व्यक्त केलें आणि म्हटलें, "म्हणजे? नवलच आहे म्हणायचं? असं कसं ग?"

सासरची कांहींच माहिती नसलेल्या कावेरीनें तिला फक्त एवढेंच सांगितलें, "खरं सांगूं तुला! अजून मला तितकी माहिती नाही. पण श्रीमंती

घरांत दिसते खरी ! मला एकच बरं वाटलं, भाऊंना फारसा हुंडा द्यावा लागला नाहीं ! ”

तिची मैत्रीण त्यावर नुसती हसली होती. कावेरीनें तिला विचारलें, “ हसलीसशी ? ”

“ उगीच ! हुंड्यावरून आठवण झाली. ”

“ काय ? ”

“ कांहीं नाहीं ! आमच्याकडे मला नेहमीं म्हणायचं असतं, ‘ तुझ्या वडिलांनीं मला २५० च हुंडा दिला, म्हणून ! तुझं सासर श्रीमंत असूनही त्यांनीं फारसा हुंडा घेतला नाहीं. ”

“ माझं राहूं दे ग ! पण तुला कशाला हुंडा आड येईल ? दिसायला चांगली आहेस तूं ! ”

“ माझं सगळंच ठीक आहे कावेरी ! निदान सध्या तरी आनंदांत आहें मी. यांना पगारही बरा मिळतोय नि घरांत आम्ही तीन माणसं. हे, मी नि मोहन ! ......खरंच ! काय ग ? एक विचारूं का ? ... का रागावशील ? ”

“ इश्य ! विचार कीं ? राग कसला यायचाय ? ”

“ विचारूं ? ”

“ हं ! ”

“ ओळख झाली कीं नाहीं त्यांची नि तुझी ? ”

कावेरीच्या चेहेऱ्यावर लाजेचा नाच सुरू झाला. खालींवर होणाऱ्या उरोजांवर हात ठेवीत तिनें म्हटलें होतें, “ कांहीं तरीच तुझं ! अजून नीट बोललेही नाहींत माझ्याजवळ. एक दोनदां मींच बोलायचा प्रयत्न केला पण ......मला खरंच लाज वाटली...... ”

आणि हें सांगतांनाही कावेरी खरोखरच लाजली होती. तिच्या मैत्रिणीनें तिला कानमंत्र दिला, “ अग ! सगळं होतं नीट ! नाहींतर आपणच व्हावं झालं जरासं धीट...... ”

“ चल ! चावट आहेस झालं ! ” म्हणून कावेरीनें तिला दूर केली होती.

त्या साऱ्या गोष्टी कावेरीला आठवल्या. आपलें लग्न झालेंच नसतें तर......! असा एक विचित्र विचारही तिच्या मनांत येऊन गेला. ‘ खरंच !

लग्नच झालं नसतं तर ......? तर? आपण आनंदानं आपल्या घरीं राहिलों असतों.'

पण तसें राहाण्यांत तरी आनंद होता का? होय! लग्नानंतरच्या आयुष्याशीं तुलना करतां खास होता!

तिच्या लग्नाचें ठरलें तेव्हां सावत्रआईच्या काचांतून सुटल्याबद्दल तिला कवढा आनंद झाला होता! झालें! आईचा काच सुटला, वडिलांचा जीव हलका झाला. सारे म्हणाले, "छान झालं! कावेरीचं लग्न जमलं! इनामदारांची सून होणार! छान! छान!"

दुसरे कोणी म्हणाले होते, "चांगलं बाळबोध दिसतंय घराणं! मुलानं पाहिलं दिखील नाहीं मुलीला. सासऱ्याला पसंत, तर मुलाला पसंत. इतर स्वतःचं स्वतःच जमविणाऱ्या शहरी छचोर मुलांसारखे नाहींत दिसत इनामदार! किती झालं तरी खानदानी वळण!"

शेजारणी म्हणाल्या, "कावेरी! सुटलीस बाई! माईनीं फार हाल केले हो तुझे! बरं झालं! तुला सासू नाहीं म्हणे? बाकी तेंही चांगलंच म्हणा! उगाच त्रास नको! पहिल्या दिवसापासून तूं मालकीण."

कावेरी उल्हसित अंतःकरणानें सगळें ऐकत होती. एकदां तिला वाटलें होतें, "आपले भावी ते! पाहावेत प्रत्यक्ष लग्नाआधीं!"

पण...! तसें ती वडिलांना कसें सांगणार? भाऊ, तिचे वडील, करतील तें चांगलेंच असेल, अशी तिची पूर्ण खात्री होती.

लग्न-सोहाळा पार पडला, तो तिच्या कोंकणांतल्या गांवींही नाहीं नि सासरच्या गांवींही नाहीं. तर मुलाचे मामा राहात असत त्या तिसऱ्याच एका छोट्याशा खेडेगांवांत. फारशी गडबड नाहीं, गाजावाजा नाहीं, माणसें नाहींत, कांहीं नाहीं! तिला आश्चर्य वाटलें, 'एवढें इनामदार घराणें; थोरल्या मुलाचें लग्न, पण कांहींच गडबड नाहीं! असें कां? इतकीं साधीं माणसें आहेत?'

तिनें आपल्या पतीला प्रथम पाहिलें तें अंतर्पाट दूर झाल्यानंतर माळ घालतांना! तसे चांगले होते ते दिसायला. तिनें त्यांच्या गळ्यांत माळ घातली. पौरोहित्य करणाऱ्या भटजींनीं सांगितलें, 'हं! केशवराव! घाला माळ."

पण माळ घालण्याऐवजीं केशव ताठर डोळे करून तिच्याकडे पाहात होता. अष्टपुत्री नेसलेल्या कावेरीला त्याचें तें पाहाणें चमत्कारिक वाटून ती स्वतःशींच म्हणाली, “ अं! हें काय ! ”

भटजी पुन्हा म्हणाले, “ हं ! इनामदारसाहेब ! घाला माळ ? ”

पण इनामदारांनीं पुन्हा डोळे ताठ केले नि ओरडून म्हटलें, “ मला फसवतांय काय ? रोशन कुठाय ? ”

“ आला ! आला ! रोशन आला ! असं काय करतांय ? घाला माळ ! ” कोणींतरी चपळाईनें पुढें आलें नि इनामदारांचा हात धरून कावेरीच्या गळ्यांत माळ टाकण्यांत आली.

घास, रासनहाणीं, वरात, असले कांहींच प्रकार झाले नाहींत. लग्न सोहाळा आवरला नि कावेरीनें सासरीं प्रयाण केलें.

सासरीं जातांना घरची ओढ लागावी असें भाऊंशिवाय जिव्हाळ्याचें कोणीच नव्हतें ! माईंना कांहीं वाईट वाटलें असेल तर तें एक फुकट अन्नावारी काम करणारें माणूस कमी झालें एवढेंच. भाऊंनीं तिच्या पाठीवर हात ठेवून तिला सांगितलें होतें, “ जा. जपून अस ! तुझ्या आईमागें मींच लहानाची मोठी केलीय तुला ? नीट जपून वाग ! ”

तिचा कंठ दाटून आला होता. झालें ! तें कोंकणचें घर, घरामागचे ते माड, विहीर, रहाट चालतांना होणारा “ कुरु कुरु करु...... ” असा विचित्र पण लयबद्ध आवाज, मैत्रिणी, समुद्रावर हिंडायला जाणें, सारें सारें नाहींसें होणार होतें.

कुठलें तें देशावरचें खेडेगांव ! अपरिचित श्रीमंत माणसें;... ‘ इथेंच वाकलीस; इथेंच बसलीस; इथेंच चुकलीस; ’ अशा तक्रारी......‘ नको तें विवाहित आयुष्य ! गाडींतून उडी टाकावी नि घराकडे धाव घ्यावी. ’

पण प्रसंग माणसाला तयार करीत असतो. ती सासरीं आली; दोनच दिवसांनीं घरकामांत लक्ष घालूं लागली. आणि तसें लक्ष घालणें तिला भागच होतें. सख्खी सासू तिला नव्हतीच. तिचा फोटो मात्र मुख्य दिवाणखान्यांत टांगलेला होता. रुंदट कपाळ, रेखीव नाक डोळे नि चेहेऱ्यावरचा खानदानी प्रेमळपणा...तिला वाटलें, सासूबाई असत्या तर

कदाचित् आपली आईची उणीव दूर झाली असती. तशी एक म्हातारी मावस का आतेसासू होती घरांत. पण दोन वेळ जेवणें नि संध्याकाळीं राममंदिरांत पुराणाला जाणें यांशिवाय तिला कांहींच करतां येत नसे.

तिचे सासरे आबासाहेब! पाहिल्याबरोबर नजरेंत भरावी अशी भव्य देहयष्टि होती त्यांची. सफेत होऊं पाहाणाऱ्या छपरी मिशा, घेरा, जुन्या पद्धतीचा आंगरखा, त्यावर स्वच्छ उपरणें, पायांत वाहाणा...पण कां कोण जाणे, कावेरीचें मत कांहीं त्यांच्याबद्दल फारसें चांगलें झालें नाहीं. उलट तिला वाटलें, हा इसम फायद्यासाठीं काय वाटेल तें करायला मागेंपुढें पाहाणार नाहीं!

त्याशिवाय तिला दोन नणंदा होत्या. पण त्या आपापल्या सासरीं नांदत होत्या. म्हातारी मावस कीं आतेसासू सोडली तर आणखी एक व्यक्ति घरांत होती. ती म्हणजे तिच्या नवऱ्यापेक्षां दोनच वर्षांनीं लहान असा तिचा दीर चंद्रकान्त. सारे त्याला चंदू अगर चंदूलाल म्हणत.

इतरांनीं तसें म्हणावें असाच तो वागे.

इंग्रजी पांचवींतच त्यानें शाळेला रामराम ठोकला होता. विलायती शिक्षणावर बहिष्कार असला, तरी विलायती आचार त्याला हवेसे वाटत. त्याचे ते रंगीबेरंगी कपडे नि बोलण्याची ऐट पाहून हा अर्धवट शाळा सोडलेला असेल असें कोणालाही वाटलें नसतें. कधीं साहेबी तर कधीं पठाणी, मुसलमानी असले वेष करून गांवांत मिरवणें हा त्याचा आवडता व्यवसाय होता. श्रीमंती असल्यामुळें मित्र मिळायला कांहींच अडचण नव्हती. सारे म्हणत, “चंदूलाल! चैन आहे तुमची. थोरला भाऊ केशव, वेडपट होऊन बसलाय, आतां आबासाहेबांच्या मागें इस्टेट तुमचीच!”

कावेरीला या साऱ्या प्रकाराची कल्पना प्रथम कुठून यायला! ‘आपला नवरा असं बावचळल्यासारखं काय करतोय’ असा एक विचार मात्र लग्नाच्या वेळेस तिच्या डोक्यांत आला होता. पण जांवईबापूंची तबियत बरी नाहीं असें उत्तर मिळाल्यामुळें तिला गप्प बसावें लागलें होतें.

लग्नानंतर सासरीं गेल्यावर ती पुण्याला गेली होती. पण तेथून परत आल्यानंतर आबासाहेबांनीं तिला सांगितलें होतें, “तूं मास्तरची मुलगी नाहींस! इनामदारांची सून आहेस. घराण्याच्या इभ्रतीला साजेल असंच

तुला वागलं पाहिजे. अलीकडच्या शहरी मुलींप्रमाणें नवऱ्याशीं बडबडणं, गप्पा मारणं, हिंडणं, असले प्रकार चालायचे नाहींत आणि त्यांतून तो आजारी आहे. मी सांगेपर्यंत त्याच्या खोलींत पाऊल टाकतां कामा नये! जाशील तर याद राख! या घरांत माझी सत्ता आहे."

कावेरी घाबरून गेली. पतीकडे जायला मुलगी किती उत्सुक असते हें तिला मैत्रिणींच्या सांगण्यावरून ठाऊक होतें. असें असतांना मामंजींनीं असें कां सांगावें, याचें तिला नवल वाटलें. किती मनोरे रचले होते तिनें? 'आपलें घर? आपली खोली! आपले हौशी पति!' नूतनविवाहित तरुणींच्या स्वप्नसृष्टींत भावी आयुष्याच्या रम्य कल्पनाचित्रांत कोणते मधुर रंग भरले जातील हें काय सांगायला पाहिजे?

सासऱ्यानें बजावलें होतें तरी तरुण मन कसें गप्प बसणार? त्याच दिवशीं दुपारीं तिला हवी होती तशी संधि आली. चंदू गांवांत भटकत होता. आबा कोठेंसे गेले होते. म्हातारी सासू माजघरांत खोकत बसली होती नि गडी-माणसें आपापल्या कामांत होतीं. ज्याची आपली जन्मगांठ बांधली गेली त्याच्याशीं चार शब्द बोलावेत, म्हणून मोठ्या अधीरतेनें तिनें नवऱ्याच्या खोलीकडे धाव घेतली.

तिचा नवरा, आबासाहेब इनामदारांचा थोरला मुलगा केशव, खुर्चीवर स्वस्थ बसला होता. कावेरी धिटाईनें दारापर्यंत गेली आणि उभी राहिली. अगदीं स्तब्ध! तिची अपेक्षा होती, त्यानें मागें वळून पाहावें आणि म्हणावें, "अं! कोण? कावेरी? ओहो? येना? मी वाट पाहातोंय्; अजून कां नाहीं आलीस?"

तसें कांहींच घडलें नाहीं. पांच मिनिटें कावेरी तशीच उभी होती; तरी केशवनें तिच्याकडे पाहिलें नाहीं. त्याच्या अंगांतल्या शर्टवर तपकिरीचे डाग पडले होते. दाढी थोडीशी वाढली होती आणि शून्यपणें तो आढ्याकडे पाहात होता. कावेरीच्या अस्तित्वाची जाणीव त्याला असल्याचें यत्किंचितही दिसलें नाहीं. अखेरीस तीच पुढें झाली. औत्सुक्य आणि भीति यांचें विलक्षण संमिश्र सुख तिला होत होतें. सावकाश जवळ जाऊन तिनें हळूच विचारलें,

"काय होतंय? असं काय बसायचं बरं?"

केशवनें तिला ओळखलें कीं नाहीं कोण जाणे ? त्यानें तिच्याकडे वेड्यासारखें पाहात म्हटलें,

" कोण तुम्ही ? कां आलांत इथें ? "

कावेरीला कांहींच कळेना. हा थट्टेचा तर एक प्रकार नसेल ना, अशी ओझरती शंका तिला आली. पण त्याच्या गंभीर मुद्रेकडे पाहिल्यावर तिला तेंही खरें वाटेना. हलकेच पण प्रेमळ आवाजांत तिनें म्हटलें, " असं काय करायचं ? मी कावेरी ! तुमची पत्नी......"

पण तिचें वाक्य पुरें झालेंच नाहीं. छोट्याशा बिंदूतून गोष्टींतला मोठा राक्षस निर्माण व्हावा तसा केशव एकदम चवताळून उठला आणि जवळ जवळ आंगावर धावत जाऊन मोठ्यानें ओरडला,

" झूट ! एकदम झूट ! कोण माझी तूं ? मी फक्त रोशनला ओळखतों ! बोल ! तूं रोशन आहेस ? "

आणि हें विचारतांना त्यानें तोंड, डोळे नि हात असे कांहीं केले, कीं विजा नि मेघांचा कडकडाट ऐकतांच लहान बालकानें घाबरून जावें तशी ती घाबरून गेली. तिच्या तोंडांतून अक्षर उमटेना. घशाला कोरड पडूं लागली. हातापायांना प्राण नाहीं असें वाटूं लागलें. अक्षरक्षः दीन होऊन तिनें फक्त नकारार्थी मान हालविली.

पहिल्यापेक्षांही दुप्पट जोरानें केशवनें गर्जना केली, " बोल ! नाहींस ना रोशन तूं ! चल ! नीघ मग ! खबरदार पुन्हा खोलींत पाऊल टाकशील तर ! जीव घेईन... ! "

केशवनें असा कांहीं अभिनय केला, कीं बाईनेंच काय, पण आडदांड माणसानेंही घाबरावें. कावेरी त्याच पावलीं खोलीबाहेर आली.

भीतीनें तिचें आंग इतकें थरथरत होतें, कीं केशवनें खोलीचा दरवाजा धाडकन लावून घेतला तेंही तिच्या लक्षांत आलें नाहीं.

" हें आहे काय ? आपले पति असं काय करतात ? ही रोशन कोण ? लग्नाच्या वेळेसही ते असंच कांहींसं म्हणाले होते ?......" तिला कांहींच कळेना ? सामान्य बाईच्या डोक्यांत येणारा एकच विचार तिच्यापुढें नाचत होता, " काय वाढून ठेवलंय् आपल्या आयुष्यांत ? "

तशा स्थितींतही तिचें लक्ष कौलाराखालीं बसलेल्या एका चिमणाकडे गेलें. चिमणी बसली होती आणि दुसरा – चिमणाच असावा तो – तिच्या चोंचींत चोंच घालीत होता. हाय ! आपल्या नशिबीं ? तिला एक जबरदस्त हुंदका आला.

कसाबसा तिनें तो आवरला. पदरानें डोळे पुसले आणि सहज बाजूला नजर टाकली. तिचा दीर चंदू ! एकाग्रतेनें तिच्याकडे पाहात उभा होता.

दिरासमोर शोभा नको या विचारानें तिनें डोळे पुसले आणि ती चालूं लागली.

" वहिनी ! " चंदूनें हाक मारली.

तिला पेंच पडला. जावें कीं थांबावें ? थांबावें, तर काय म्हणून विचारल्यानंतर काय उत्तर द्यायचें ? पुढें जावें तर उर्मटपणा पदरीं येतो. अखेरीस ती थांबली.

" वहिनी ! केशवच्या खोलींत गेलां होतां ? " चंदूनें सहानुभूतीनें विचारलेल्या प्रश्नाला तिला खोटें उत्तर देववेना. तिनें खालच्या मानेनें म्हटलें, " हो ! गेलें होतें. "

" कशाला गेलां होतां ? "

" कां ? मी नाहीं जायचं तर कुणी ? "

" मी सांगतों ! जीव शाबूत राहावा असं वाटत असेल तर त्याच्या खोलींत जाऊं नका ! त्यांतून जावंसं वाटलंच तर माझी खोली......... "

आणि फिदी फिदी हसत तो तेथून निघून गेला.

कावेरीला त्याचा राग आला. पण...ती काय करणार ? सारा दिवस विषण्ण चित्तानें ती कसें तरी घरकाम करीत होती. घरांतल्या भानगडी एक वेळ घरांतल्या माणसांना कळणार नाहींत, पण गडी माणसांना खास कळतात.

झाडसारवण करायला येणाऱ्या सगुणा मोलकरणीनें दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिला विचारलें, " वैनीबाय ! तुम्ही काल सांजच्या वक्ताला केशवदादांच्याकडे........ "

कावेरीनें बावरून म्हटलें, " कुणीं सांगितलं तुला ? "

" तुम्ही घरांत आल्या दिवसापासन वाइट वाटतंय् मला वैनीबाय ! लक्ष्मीवानी दिसताय तुम्ही ! त्या येड्याच्या गळ्यांत बांधून सत्यानाश केला आबा इनामदारानं तुमचा ! देव कंदी बरं करणार न्हाई त्याचं."

सगुणानें कळवळून काढलेल्या त्या उद्गारानें कावेरीला वाटलें, ' आपण कोलमडून तर पडणार नाहीं ? '

कसेंबसें स्वतःला सावरीत तिनें म्हटलें, " म्हणजे ? "

आणि मग तिला जी माहिती कळली होती, ती ऐकल्यानंतर तिलाच काय, पण ऐकणाऱ्या तिऱ्हाईत माणसालाही धक्का बसला असता आणि त्यानें म्हटलें असतें,

" इतकीं नीच माणसं असतात या जगांत ? "

तिला कळली ती हकिकत अशी होती–

त्या छोट्याशा गांवांत आबासाहेब इनामदारांचें घराणें फार पूर्वीपासून प्रसिद्ध होतें. पेशव्यांच्या वेळीं इनामदार घराण्यांनीं फार मोठमोठे पराक्रम केले होते आणि त्या वेळेपासून आजतागायत त्यांची इनामदारी चालू होती. संततींत भर पडत होती पण असलेल्या संपत्तींत भर टाकण्याचें काम मात्र कोणींच केलें नव्हतें. उलट प्रत्येक पिढीचा इनामदार स्वतःला मोठा समजून चैन करीत होता. आबासाहेबांनींही पूर्ववयांत बरेच रंगढंग केले होते. जेमतेम पोटाला राहील इतकेंच उत्पन्न आतां शिल्लक होतें. पण ! राहाणी बदलली होती का ? छे ! ती तशीच, उलट वाढत्या श्रेणीनें चालू होती. मुली सासरीं नांदत होत्या. मुलें दोनच. केशव नि चंदू !

केशवनें मॅट्रिक होऊन मुंबईला कॉलेजांत जाण्यापर्यंत मजल मारली होती. चंदूनें शाळेला केव्हांच रामराम ठोकून गांवांत नुसतेच हिंडायला सुरुवात केली होती.

केशव मुंबईला असतांना घडलेली गोष्ट. तो दिसायला चांगला होता. पण लहानपणीं बऱ्याच मोठ्या जिवावरच्या आजारांतून उठल्यापासून त्याचा मेंदू फार हलका नि भावनाधीन झाला होता. जरा त्याच्या मनाविरुद्ध झालें तरी तो संतापे. त्याला कोणी फारसें बोलत नसे.

कॉलेजचें आयुष्य चैनींत काढावें नि घरून लागतील तसे पैसे मागवावे, याव्यतिरिक्त त्यानें मुंबईला कांहींच केलें नव्हतें. पण त्याच्या साऱ्या

आयुष्याला एकदम अनपेक्षित विलक्षण बदल मिळावा अशी एक गोष्ट तो इंटरमध्यें असतांना घडली.

त्याच्या वर्गात एक मुसलमान तरुण होता. मोठा उमदा नि लाघवी. त्याचा खर्च नि कपडे पाहिले म्हणजे केशवला वाटे, " आयुष्याचा खरा उपभोग घ्यावा या मुसलमानांनींच ! "

तो केशववर विलक्षण प्रीति करी नि केशवही वारंवार त्याच्या घरीं जात असे. त्याचा बाप मुंबईतला एक प्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर असून मलबार हिलवरचा त्याचा भव्य राहाता बंगला सोडला, तर ग्रॅन्टरोड, महालक्ष्मी नि दादर मिळून त्याच्या सात आठ चाळी होत्या हें केशवला माहीत होतें, इतकेंच नव्हे तर इस्लामी धर्माच्या विलक्षण प्रेमामुळें कीं वेडामुळें तो त्याच्या जमातींत फार मोठा असामी गणला जाई हेंही त्याला ठाऊक होतें.

मुसलमान मित्राच्या आग्रहाखातर केशव त्याच्या बंगल्यावर जाईच पण तरीही जावेंसें वाटावें असें एक जबरदस्त आकर्षण तेथें होतें नि तें म्हणजे त्या मित्राची बहीण...रोशन ! रोशन नांवाप्रमाणें सौंदर्याची रोषणाई होती. वयानें वीस, ओठ गुंजेसारखे लाल, काश्मिरांत बाळपण गेल्यामुळें कानशी-वरचा गुलाबी रंग...ऐषाराम नसानसांत मुरलेल्या केशवला रोशन म्हणजे एक स्वर्गीय गीत वाटूं लागलें. मुसलमानी वेषांत तर रोशन चांगली दिसेच पण केवळ लहर म्हणून ती जेव्हां गुजराथी पद्धतीची भारी साडी नेसे तेव्हां केशवला वाटे, स्वर्गांत अप्सरा असतात ही केवळ थाप असावी. नव्हे ! अशी कल्पना लिहिणाऱ्या कवीनें गुजराथी वेषांतल्या रोशनला पाहिलें असतें, तर खचित् त्यानें लिहिलें असतें, स्वर्गांतच अप्सरा असतात असें नव्हे ! या नाशवंत पृथ्वीतलावर मुंबईतसुद्धा आहेत. खोटें वाटत असेल तर पाहा रोशनकडे !

केशवचा कॉलेजचा अभ्यास 'रोशन'कडेच होऊं लागला. तीही केशवकडे आकर्षिली जाऊं लागली. प्रथम प्रथम हें कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. पण...प्रगतिप्रिय असलें तरी तें एक खानदानी मुसलमान घराणें होतें. आस्ते आस्ते केशव रोशनकडे ओढला जात आहे आणि रोशनही

आपली प्रीतिलता केशवच्या प्रेमजलानें फुलवीत आहे, हें वरच्या मंडळींच्या लक्षांत यायला वेळ लागला नाहीं.

रोशनचा एक चुलता होता. फार धर्मवेडा. एका काफरानें आपल्या काबुली द्राक्षाप्रमाणें गोड नि मोहक असणाऱ्या पुतणीशीं बोलावें, इतकेंच काय, आपल्या घरीं यावें, हेंही त्याला आवडलें नाहीं.

एक दिवस त्यानें केशवची कानउघाडणी केली. इतकी, कीं आयुष्यांत कोणाकडूनही बोलणीं न खाणारा केशव खूप भडकला. त्यानें रोशनच्या काकाला नाहीं नाहीं त्या शिव्या दिल्या.

पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. रोशनच्या वडिलांनीं तिला आपल्या गांवीं पाठवलें आणि पुढें तिचें जमातींतल्याच एका तरुणाशीं लग्न झालें.

आणि ती बातमी कळल्यावर तो प्रीतिवियोगाचा आघात सहन न होऊन केशवचें जें डोकें फिरलें तें कायमचेंच. त्याचें लक्ष अभ्यासांतून उडालें. इतकेंच नव्हे तर रोजच्या व्यवहारांत वागतांनाही तो वेड्यासारखें करूं लागला. इंटरला एका पेपरांत तर त्यानें ‘ रोशन, रोशन ’ अशींच अक्षरें लिहून ठेवलीं.

आबासाहेबांना ही गोष्ट कळतांच ते मुंबईला आले. अनेक डॉक्टरी उपाय झाले, पण कशाचाच इलाज चालेना. कधीं कधीं तो बरें बोले, पण एखादे वेळेस असं होई, कीं त्याच्याशीं बोलणें एक कोडें होऊन बसे. एका डॉक्टराचें तर असें स्पष्ट मत होतें, कीं त्याला खाण्याच्या जिनसांमधून असा कांहीं पदार्थ देण्यांत आला आहे, कीं त्यामुळें बिघडलेलें त्याचें डोकें, कधीं सुधारूंच नये !

शंभरी नंबरी नास्तिकसुद्धा प्रसंग येतांच देवाला आळवूं लागतो. डॉक्टरी उपाय थकल्यामुळें देवस्थानें, अंगारे–धुपारे, मंत्र-तंत्र, गंडे, ताईत सारें झालें. पण बिघडलेलें केशवचें मन कोणीच सुधारूं शकलें नाहीं.

आबासाहेबांनीं त्याला उचललें नि घरीं आणून ठेवलें. एक खोली त्याला दिलेली असे. लहर आली तर जेवण-खाण, नित्य व्यवहार करावे. आबासाहेबांना वाटे, “ कसं होणार याचं ? ”

कोणींतरी त्यांना सल्ला दिला, " आबासाहेब ! लग्न करून द्या मुलाचं. येईलही कदाचित् ताळ्यावर ! "

सांगणाऱ्याला सांगायला सोपें होतें ! पण केशवचं लग्न जुळवणें कसं शक्य होतें ? आजपर्यंतच्या इनामदार घराण्याच्या परंपरेला साजेल अशा बरोबरीच्या प्रतिष्ठित माणसाची मुलगी सून म्हणून मिळाली तरच आबासाहेबांना हवी होती ! पण... इनामदार झाला ... तरी वेडा इनामदार कोणत्या मुलीला आवडणार ?

अखेरीस कोणी तरी तोडगा सुचवला, " असेना का गरिबाची ! हुंडा न घेतां उरकावं दोन्ही आंगीं ! हो ! मुलाचं लग्न तर झालं पाहिजे ? "

जिलबीच हवी म्हणणारा माणूस कांहींच न मिळाल्यानंतर शिळ्या भाकरीलासुद्धा राजी होतो. ' गरिबाची मिळाली तर गरिबाची पण एकदां लग्न झालं म्हणजे सुटलों. मुलगा सुधारेल नि धाकट्या मुलाच्या लग्नाला अडचण राहाणार नाहीं. नाहींतर थोरल्याचं लग्न झालं नाहीं, म्हणजे मग लोक म्हणायचे, थोरल्याचं झालं नाहीं ! धाकटा तरी कसा आहे कोण जाणे ? '

आबासाहेब इनामदारांकडे सरकारी वरिष्ठ अंमलदार बरेच वेळां येत. आणि त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें नि आवडी-निवडीप्रमाणें त्यांची व्यवस्थाही नीट ठेवली जाई. आबांनीं सगळ्यांना सांगून ठेवलें होतें, " कांहीं करा ! अपराध्याला निरपराधी ठरवतां; फासावर लटकला जावा इतकी लायकी असलेल्या व्यक्तीच्या गळ्यांत फासाऐवजीं फुलांचे हार पडावेत असं करतां, मग तेवढं लग्न जमवा माझ्या मुलाचं ! देशी आणि विलायती, दोन्ही तऱ्हेच्या जंगी मेजवान्या देऊं ! "

अधिकारी मंडळी माना डोलावून म्हणत, " वा ! वा ! आबासाहेब ! अरे ! तुमचं काम तें आमचं काम ! आमचा मुलगा नि केशव दोन का ? "

अखेरीस त्यांच्याकडे येणाऱ्या एका स्कूलइन्स्पेक्टरनीं त्यांच्या मुलाचें लग्न जमविण्याचें श्रेय घेतलें.

तो इन्स्पेक्टर जातीनें मराठा होता. कोंकण प्रांतांतल्या शाळांवर तपासणी-साठीं त्याची नेमणूक झाली होती. तपासणीसाठीं जाणारे इन्स्पेक्टर्स मुक्कामाला शाळेच्या हेडमास्तरांकडेच असायचे. कावेरीचे वडील ज्या

शाळेचे हेडमास्तर होते त्याच शाळेच्या तपासणीला सदर इन्स्पेक्टर गेले होते. त्यांचा मुक्काम कावेरीच्या वडिलांकडेच होता.

कोंकणांतले शाळामास्तर किती अठरा विश्वे दरिद्री असतात याचा इन्स्पेक्टरना चांगलाच अनुभव होता. जेवायला बसल्यावर कावेरी वाढायला आली होती.

शहरांत मिळणार नाहीं अशी दणकट हाडापेराची किंचित् काळी पण पाहातांक्षणींच आकर्षक वाटणारी कावेरी पाहिल्यानंतर इन्स्पेक्टरना वाटलें, " खेड्यांतल्या दरिद्री मास्तरला इतक्या चांगल्या मुली असतात ? "

जेवण झाल्यावर सुपारी खातांना इन्स्पेक्टरनीं विचारलें, " मास्तर ! मुलीच्या लग्नाचे लाडू देणार कीं नाहीं आम्हांला ? "

इन्स्पेक्टरकडून इतका खेळीमेळीचा प्रश्न ऐकून मास्तरना एकदम बढती मिळाल्याचा आनंद झाला. त्यांनीं लवून म्हटलें, " विचार आहे यंदा ! जमलं तर... "

" हात्तिच्या ! इतकंच ना ? मी जमवतों ! "

" खरं ! "

" तर ! पण आमच्या देशावरचा मुलगा चालेल तुम्हांला ? "

" नवऱ्या मुलीला आणि शाळा–मास्तरला स्वतःच्या आवडी–निवडी ठेवून चालत नाहीं साहेब. "

" वा ! वा ! छान ! असं फक्कड स्थळ देतों तुम्हांला ? इनामदार माणसं आहेत इनामदार ! "

" ऑं ! " किंचित् अविश्वासाच्या स्वरांत मास्तरनीं विचारलें, " खरं ! आम्हांला कसं झेपणार मग ? "

" त्याची काळजी तुम्हांला नको ! " एक एक शब्द सावकाश उच्चारीत इन्स्पेक्टर म्हणाले, " माणसं फार चांगलीं आहेत. एक पैही हुंडा घेणार नाहींत. फक्त सासरा इथें येऊन पाहून जाईल. ते सांगतील त्या गांवीं तुम्ही दोघाचौघांनीं जायचं नि लग्न उरकून घ्यायचं ! बस्स ! "

जणूं कांहीं जांवई मिळालाच अशा समजुतीनें मास्तरनीं म्हटलें, " पण...! आम्ही कोंकणचीं माणसं... "

"असूं द्या हो! शहरांतल्या भपक्याला भुलणारे नाहींत इनामदारसाहेब! आणि कोंकणच्या मुली किती सुरेख असतात हेंही त्यांना माहीत आहे! मी सांगतो ना!"

"इन्स्पेक्टर कसं कांहीं तरी खोटंच सांगतील?" ते गेल्यावर मास्तरना वाटलें, आज देवच आला इन्स्पेक्टरच्या रूपानें आपल्याला भेटायला.

कावेरीला ती सारी हकीकत आठवत होती. आपलें लग्न आपल्या गांवीं अगर त्यांच्या स्वतःच्या गांवीं न करितां परक्या गांवीं कां केलें याचाही उलगडा तिला झाला. न जाणो! गांवांतल्या कोणी चहाडी केली नि लग्न मोडलें तर?

सगुणा मोलकरणीनें सांगितलेली ती हकीकत ऐकून कावेरीला केवढा धक्का बसला होता! तिच्या नवऱ्याचें सुखी आयुष्य संपलेंच होतें पण तिच्या सुखालाही काडी लागली होती आणि त्याला जबाबदार कोण होतें?

नसतें झालें केशवचें लग्न, तर दुनिया कांहीं ओस पडत नव्हती! उलट एका जीवाची आहुति निष्कारण पडली, ती तरी पडली नसती! पण ......

केशव वेडा नाहीं हें जगाला समजावें, इनामदार घराण्याचा नांवलौकिक जाऊं नये, धाकट्या मुलाचें लग्न व्हावें, म्हणून...... तिचा बळी द्यावा लागला होता.

तशा परिस्थितींतही ती आनंदी असती, पण आनंदी असण्यासारखें होतें काय? संसारसुखाची आशा केव्हांच लुप्त झाली होती. आतां फक्त अन्नासाठीं नामधारी इनामदारीण म्हणून तिला आयुष्य काढायचें होतें.

खरी वस्तुस्थिति कळल्यापासून तिचा उत्साह कोठल्याकोठें नाहींसा झाला होता! खूप चडफडली ती स्वतःवर, सासऱ्यावर, वडिलांवर, चंदूभावजींवर, त्या आगलाव्या खापरतोंड्या इन्स्पेक्टरवर, जगावर! पण काय उपयोग होता?

आलें जीवन निमुटपणें काढणें तिला भाग होतें. नव्हे! तसें तें तिनें मुकाट्यानें कंठावें अशीच साऱ्यांची अपेक्षा होती.

स्त्री कामाला कंटाळत नाहीं, स्त्री दारिद्र्याला कंटाळत नाहीं, स्त्री दुःखाला कंटाळत नाहीं. ती कंटाळते फक्त नीरस, निःसत्त्व आयुष्याला.

ज्याच्या आवडी-निवडी, हौसा-मौजा, हवें-नको, यांवर तिनें लक्ष ठेवायचें, त्यांतला आनंद घ्यायचा, तो कोपऱ्यांतल्या खोलींत कडी लावून बसे नि तिला मर्जी सांभाळावी लागे म्हाताऱ्या सासऱ्याची नि रंगेल, उनाड, लहरी दिराची.

साऱ्यांपासून ती जपून असे. नि चंदूपासून तर विशेषच. सगुणा मोलकरणीनें तिला त्याच्याबद्दल दोन तीन गोष्टी सांगितल्या होत्या आणि डोळ्यांत आसवें आणून म्हटलें होतें, " वहिनीबाई ! खोटं बोलत नाहीं. आम्ही दोन तिन पिढ्या इनामदार घराण्याचं अन्न खाल्लं आहे. पण...... चंदूलालला पाहिलं, कीं वाटतं धरावा नि मुंडक्यावर पाय द्यावा त्याच्या ! माझी एकुलती एक तरणी ताठी पोर ! इथें यायची कामाला. एक दिवस संध्याकाळीं ती गोठ्यांत गुरांना दाणा वैरण करीत असतांना चंदूलालनं तिला धरली............माझी मुलगी म्हणून सुटली. खूप रागावलें मी ! पण काय करणार ? आश्रित माणसं आम्ही. सगळे सरकारी अंमलदार यांच्या ओळखीचे नि तेही तसेच मेले ! तो शाळा तपासणारा का झाडणारा इन्स्पेक्टर ! वाटोळं होईल मेल्याचं. असा तिरवा डोळा करून पाहायचा माझ्या लेकीकडे........ "

कावेरीच्या मनांत आलें होतें, तिला सांगावें, " तुझ्या मुलीवर फक्त वाईट नजरच ठेवली. पण माझ्या जन्माचं वाटोळं केलंन् त्यानं......" पण ती गप्प बसली.

वडिलांनीं यांतलें अवाक्षरही कळवायचें नाहीं हें तिनें निश्चित ठरवून टाकलें होतें.

एक दिवस आंग धुऊन ती माजघरांत पातळ नेशीत उभी होती. नुकताच उठलेला चंदूलाल चहा पिऊन इकडे तिकडे हिंडत होता. माजघरांत येऊन पातळ नेसणाऱ्या कावेरीकडे पाहात त्यानें म्हटलें, " वहिनी ! कोणत्याशा लेखकानं म्हटलंय् ! तुम्हांला आठवतंय् ? "

भाबडेपणानें कावेरीनें विचारलें, " काय ? "

" बायका लुगडं नेसल्यानंतरपेक्षां नेसतांनाच जास्त चांगल्या दिसतात. तुमच्याकडे पाहिल्यानंतर...... " आणि डोळे मिचकावीत तो मोठ्यानें हसला.

"भावजी! बाहेर व्हा खोलीच्या! मला मामंजींना हाक मारावी लागेल."

"आच्छा" सिनेमा नटासारखे हातवारे करीत किंचित् वाकून नाटकी पद्धतीनें त्यानें म्हटलें, "पुन्हा केव्हां तरी! आपलं नुसतं सूतोवाच..."

तो दिवस कावेरीला अत्यंत अस्वस्थतेंत गेला.

त्यानंतर चंदूनें आणखी दोन तीन वेळां लगट करण्याचा प्रयत्न केला. तिला वाटलें, योग्य वेळीं मामंजींना सांगावें. नव्हे! तसें तिनें सांगितलेंही. पण त्याचा परिणाम मात्र भलताच झाला. कपाळाला शक्य तितक्या आठ्या चढवून आबासाहेब मोठ्यानें ओरडले,

"काय भलतंच बरळतेस? लाज नाहीं वाटत? बोलून चालून दरिद्री शाळामास्तरची मुलगी तूं! माझ्या मुलावर असला आरोप! तरीच चंदू मला म्हणत होता, वहिनी माझ्या भोवतीं भोवतीं घिरट्या घालते. × × × नवऱ्याला सुधार जरा."

तिच्या मनांत आलें होतें. जाऊन उत्तर द्यावें, "मला नीतीच्या गप्पा शिकवतां? मोलकरणीच्या मुलीचा हात धरणारा चंदू नीतिमान्! नि मनाचा असह्य कोंडमारा सहन करून आला दिवस हसऱ्या चेहऱ्यानें साजरी करणारी मी अनीतिमान्! वेड्या मुलाच्या हातांत माझा हात देऊन माझा गळा कापतांना कुठें गेली होती नीति?"

पण...! इनामदारांच्या सुनेला असें उलट बोलणें शोभलें नसतें आणि यदाकदाचित् ती बोलतीच तर साऱ्या गांवभर तिच्या बदनामीचा डांगोरा पिटला गेला असता.

तिनें मनाशीं एकच निश्चय केला, "शक्य तितकें चंदूभावजींना टाळायचें."

पण...... मनांतले सारे संकल्प थोडेच पुरे होतात? चंदूचा मित्रपरिवार अजब होता. ज्याला दुकानांत बसून विड्या पिण्याशिवाय उद्योग नव्हता असा एक सोनाराचा मुलगा, कबुतरें उडविणारा 'हाशम', गांवांतल्या मोटर स्टँडशीं असलेला डोळ्यांत वडस वाढलेला चव्हाण हॉटेलवाला नि गांवांतील पाटलाचे चिरंजीव सुभानराव.........

सारा दिवस चव्हाणच्या हॉटेलांत, भजीं, चिवडा, चहा नि विड्या यांचा समाचार घ्यावा; नदीवर नाहींतर देवदर्शनाला जाणाऱ्या गांवांतल्या

बायकांची टिंगल करावी नि गांवांतल्या कुटाळक्या कराव्या, एवढाच त्यांचा कार्यक्रम असे.

एक दिवस गप्पा मारतांना सुभाननें म्हटलें होतें, " चव्हाणराव ! आपण खरोखर जंगी फीस्ट काढायला हवी चंदूलालकडून ! "

" कां रे बाबा ! " चंदूनें हसत विचारलें होतें.

" कां ? " सुभानकडे डोळे मिचकावीत चव्हाण म्हणाला, " लग्न झालंय् ना तुझ्या भावाचं ! "

" बरं मग ! माझा काय संबंध ? "

" वा ! वा ! खूप करताय् कीं चंदूभाई ! अहो भावाचं नि तुमचं लग्न यांत काय फरक आहे ? " पुन्हा एकदां सुभानकडे डोळे मिचकावीत चव्हाण म्हणाला, " अरे वेड्या ! देवाचा नैवेद्य देव का खातो ?. पुजाऱ्यानंच हात मारायचा ! तुझा वेडा भाऊ म्हणजे नुसता देव ! "

"नि तुझी वहिनी म्हणजे त्याच्यापुढचा नैवेद्य! काय?" सुभान सिगरेटचा धूर सोडीत म्हणाला.

इतका वेळ स्वस्थ बसलेल्या हाशमनें मिटक्या मारीत बोलायला सुरुवात केली, " वा ! वा ! अशी खूपसुरत औरत माझ्या घरीं असती नि माझा भाऊ वेडा असता तर......"

वास्तविक चंदूला राग यायला पाहिजे होता. पण तसें कांहींच झालें नाहीं. उलट वरील बोलण्यानें खूष होऊन तो म्हणाला, " दोस्त ! अगदीं खरं आहे रे ! त्याच खटपटींत आहें मी ! पण भारी तिखट काम......"

त्याचे सारे मित्र खदखदा हसले. जणूं त्यांना म्हणायचें होतें, " काय वेडा आहेस ? फुकट वावरलास आमच्यांत ? एका वेड्या माणसाची बायको नाहीं फितवतां येत तुला ? "

चव्हाण पुन्हा म्हणाले, " अरे चंदूनं काय करावीं असलीं कामं ? त्यानं भजीं खावीं नुसतीं. गेल्या वर्षींच नाहीं का ? त्या पोष्टमास्तरची छोकरी ! छान गटवली होती आपण. पण या लेकानं घाण केली ! "

असला अपमान चंदू सहन करणार ? त्यानें ओरडून सिगरेट उंच करीत म्हटलें, " दोस्त ! अग्नि हातांत आहे. नाहीं कावेरीला गटवली, तर दाढी मिशा वाढवून फिरेन......"

अशा माणसांत कावेरीला जन्म काढायचा होता! चंदूचें वागणें, त्याच्या मित्रांचीं बोलणीं, या नाहीं त्या मार्गानें तिला समजत.

आबासाहेब घरीं नसले म्हणजे त्याचे सारे मित्र जमत. विड्या ओढीत, गांवांतल्या पोरी, तमाशा यांबद्दल बोलत नि अचकट विचकट लावण्या म्हणत.

मित्र घरीं यायचे असले म्हणजे चंदू हक्कानें सांगे, "वहिनी ! आज स्नेही यायचेत माझे ! पोहे नि चहा करा ! असा फर्मास कराल ! साऱ्यांनीं स्तुति केली पाहिजे तुमची !"

कावेरी कपाळाला हात लावी. तिच्या पाक-शास्त्रनैपुण्याची तारीफ कोणीं करायची? नवऱ्यानें? छे ! गांवांतल्या चार भणंग उडाणटप्पूंनीं. ज्यांची तिचें दर्शन घ्यायचीसुद्धा लायकी नव्हती !

नवऱ्याशीं तिचें संभाषण नव्हतेंच. कठडा नसलेल्या पुलाच्या कांठानें अंधाऱ्या रात्रीं चालणारा माणूस प्रत्येक पाऊल जसें जपून टाकतो तसे भीत भीत ती त्या घरांत दिवस काढीत होती ! ती मनाशीं म्हणे, " किती दिवस असं चालणार कोण जाणे !"

चार पांच महिने अशाच आंदोलनांत गेले. केशवची प्रकृति ताळ्यावर येण्याचं कांहींच लक्षण दिसेना. उलट तो जास्तच वेडा होत चालला होता. गांवांत लोक उघड उघड बोलूं लागले होते, " इनामदारांनीं एका तरण्याताठ्या मुलीच्या जन्माचं वाटोळं केलं. काय करील बिचारी ?"

असें कांहीं ऐकलें म्हणजे आबासाहेबांच्या आंगाचा तडफडाट होई. त्यांना वाटे, केशवला एकदां मुलगा झाला म्हणजे बंद होतील सगळ्यांचीं तोंडें आपोआप.

पण बायकोकडे चुकूनही न पाहाणाऱ्या केशवच्या बाबतींत तें कसें शक्य होतें ?

तसें पाहिलें असतां मुलगा कांहीं केशवला नव्हता व्हायचा ! कावेरीला व्हायचा होता ! मग... ! ... कावेरी ? तिची चंदूविरुद्ध तक्रार ? चंदू ? सैतानाचा हात आबांच्या मस्तकांत फिरूं लागला. त्यानें विकट हास्य करून आबांच्या कानांत म्हटलें,

" होईल ! कावेरीला संतति होईल ! लोकांचीं तोंडं आपोआप बंद पडतील. कुणाला कळणार आहे ? जरा दम दिला म्हणजे झालं ! "

उन्मत्त सैनिकांना गांव लुटायला जाहीर परवाना दिल्यावर काय पाहिजे ? चंदू उघडपणें कावेरीजवळ लघळपणा करूं लागला आणि ... त्या दिवशीं तर त्यानें कहरच केला ... ... कावेरीच्या डोळ्यांपुढें पुन्हा तो प्रसंग उभा राहिला. चंदूचें तें येणें, विकट हसणें ... पुनः पुनः शब्द तिच्या कानांत घुमत होते, " वेड्या नवऱ्याची शहाणी बायको !... पुत्रप्राप्ति !... आबांची संमति...... "

तिला वाटलें, तापलेली काच तडकून फुटावी तसें आपलें डोकें फुटणार ! बरें झालें पळून जायची बुद्धि झाली. आतां गाडींत आहों तें घरीं असतों तर पेटलेल्या होळींत अब्रूसकट होरपळून निघालों असतों ... खऱ्या आगीनें झालेल्या जखमा कालांतरानें का होईना, भरून येतात. बऱ्या होतात ! पण अब्रू गेल्यामुळें झालेली जखम ! जगांतली सारी दिव्यौषधी एकत्र केली तरी भरून येणें कठीण !

गाडी चालतां चालतां एकदम थांबली. स्वस्थपणें पेंगणाऱ्या उतारूंची झोपही उडाली. सारे खिडक्यांतून तोंड काढून बाहेर पाहूं लागले. गाडी कां थांबली तें कोणालाच कळेना.

कोणी म्हणे, " सिग्नल दिला नसेल. " कोणी म्हणे, " एखादा मिलिटरी अधिकारी यायचा असेल." तर कोणा महाभागानें शंका प्रदर्शित केली, " गाडीखालीं सापडलं तर नसेल ना कुणी ? "

आणि मग गप्पांना निराळीच गति मिळाली. झोप जाण्यासाठीं म्हणून एक लांबलचक जांभई देत नि विडी पेटवीत एकानें म्हटलें, " होतं खरं असं ! मागें एका बाईनं अशीच खिडकीवाटे उडी टाकली ! "

" असं ! का ? " कांहीं उत्सुक आवाज निघाले.

जरासें हसून पहिला म्हणाला, "अहो टाकली होती नव्हे, टाकणार होती."

" हो ! पण कां ? "

" तिचा नवरा तिला सासरीं नांदायला नेत होता. तिलाच जायचं नव्हतं सटवीला ! "

" औं ! लईच होती कीं भवानी ? "

" अंह ! तसं मात्र नव्हे हं !" सांगणारा पुन्हा सांगू लागला, " तिचा नवरा होता फार दारूबाज ! निशापाणी करण्यांत पहिला नंबर. आपण हल्लीं उन्हाळ्यांत पाणी पितों ना, तसा प्यायचा दारु ! मग सांगा ! कसं नांदावं तिनं ?"

" वा ! वा ! " ऐकणारांनीं मत दिलें, " म्हणून काय झालं ! पळून जायचं ! कस बी असल तरी धनी हाय ! आँ ! अव ! कुंकवाप्रमाणंच धन्याशिवाय बाईला शोभा नाय ! काय ?"

कावेरीला ऐकवेना ! काय विचारसरणी लोकांची ! नवरा दारूबाज असला, वेडा असला, मूर्ख असला, नातेवाईक भलताच फायदा घेत असले, तरीही पत्नीनें पतीजवळ राहावें अशीच कां समाजाची अपेक्षा असते ? अशीच ! हो ! अशीच ! नाहींतर कशी !

नि अशा समाजांत तिला पुढलें आयुष्य काढायचें होतें.

मधेंच थांबलेली गाडी पुन्हा सुरू झाली. कावेरीनें मनाशीं एक विचार ठरवला, " पुण्याला उतरलं तरी आपलं खरं नांव कुणाला सांगायचं नाहीं! न जाणो ! केव्हां काय प्रसंग येईल !"

वरच्या बर्थवर निजलेल्या एकानें जांभई देत विचारलें, " कां हो ! आलं का पुणं ?"

खालून कोणींतरी उत्तर दिलें, " हां ! आलंच म्हणायचं जवळ ! पांच वाजून गेले. अर्ध्या एक तासांत येईल !"

इतर झोपीं गेलेले उतारू खडबडून जागे झाले. त्यांनीं भराभरा सामान गोळा करायला सुरुवात केली. कोणीसें खिडकीबाहेर तोंड काढून म्हटलें, " खरंच कीं ! उगवती उजळल्यासारखी दिसतेय खरीच ! चला ! आलंच म्हणायचं पुणं ! किती लांब जायचंय सदाशिव पेठेंत. गेल्यावर छानशी ताणून देणार !"

कावेरीलाही सपाटून झोप येत होती. जेमतेम बसण्याइतकीच जागा मिळाल्यामुळें तिला झोपतां येणें शक्य झालें नव्हतें. नि झालें असतें तरी संध्याकाळीं घडलेल्या त्या विलक्षण प्रसंगाचा तिच्या मनावर इतका परिणाम झाला होता, कीं तिला झोप येणें शक्यच नव्हतें.

तिचें सामान कांहींच नव्हतें. एक पिशवी होती, ती तिच्या मांडीखालींच होती. पुणें आलें कीं ती उतरणार होती.

तिच्या मनांत आलें, ' कुणी ओळखीचं पण फारसं चिकित्सा न करणारं माणूस भेटलं तर किती बरं होईल ! पण कुणीच भेटलं नाहीं तर मात्र पंचाईत. जायचं कुठं ? ' काय, हॉटेलांत उतरायचें ! पैसे कोठें होते तिच्याजवळ ? नि असल्या छानछोकी आयुष्याची तिला माहिती तरी कोठें होती ?

गाडीनें एक कर्णकर्कश शिटी दिली नि पुण्याच्या स्टेशनांत प्रवेश केला. पहाटेचें गार वारें मनाला प्रसन्नता आणीत होतें.

खूपच मोठ्या अशा त्या प्लॅटफॉर्मवर दिवे अगदीं मोजके होते. प्रकाश अंधुक असल्यासारखा वाटत होता. हमालांची धावपळ सुरू होती. जो तो डब्यांतून बाहेर निघण्यासाठीं धडपडत होता. एका हमालानें तिला विचारलें, " बाई, सामान हाय ? द्या ! झटकन् निऊन टाकतों भाइर ! मग तुमी नि सायेब या मजेंत आस्ते आस्ते ! "

त्याला कोठें ठाऊक होतें, कावेरी पतीबरोबर प्रवास करणारी भाग्यशाली स्त्री नव्हती हें ! तिला वाईट वाटलें, तिचे डोळे भरून आले. शेजारच्या डब्याशीं एकजण आपल्या पत्नीला उतरवून घ्यायला आला होता. त्यानें तिच्या हातांतलें सामान घेतलें नि म्हटलें, " उतर, दमली असशील ना ? "

तिनें फक्त हसून नवऱ्याकडे पाहिलें. कावेरीनें तोंड फिरविलें. ज्या म्हातारीनें प्रथम तिला बरेंच ऐकवलें होतें ती शेजारींच उभी होती.

दोघीही खालीं उतरल्या.

सेकंड क्लासच्या एका डब्यांतून एक ऐटबाज जोडपें खालीं उतरत होतें. त्या तरुणाचा भारी सूट, गळ्याभोवतालचा रेशमी स्कार्फ, तोंडांतला चिरूट ....नि ती तरुणीही कांहीं कमी देखणी नव्हती !

तिचें विस्कटलेलें पण तलम जॉर्जेटचें पातळ, सिल्क ब्लाऊझ, काजळ घातल्यामुळें जास्तच मादक दिसणारे डोळे...... कावेरीला वाटलें, " हिला कुठें तरी पाहिलं असावं. "

तिच्या जवळ असलेल्या म्हातारीनें मात्र ओरडून म्हटलें, " हां! हीच बया ओढत होती शिग्रेट ! "

कावेरी कुतूहलानें तिच्याजवळ गेली. आणि......आणि काय? तिला आश्चर्याचा नि आनंदाचा एक लहानसा धक्का बसला.

ती तरुणी तिच्या चांगल्या परिचयाची होती. तिच्या कोंकणांतल्या गांवांतली, तिची बालमैत्रीण, देशपांड्यांची उषा !

तिला हाक मारावी कीं नाहीं हा प्रश्नच पडला जरासा. ' उषा ! नि या वेषांत? हा तरुण कोण! तिचं लग्न झालं कीं काय? '

पण उषेच्या विचारापेक्षां स्वतःचें पुढें काय, हा प्रश्न जास्त महत्त्वाचा होता. तिनें ठरवलें, ' उषेला विचारायचं. तिनें हो म्हटलं तर जाऊं तिच्या बरोबरच. '

आणि पुढें होऊन तिनें हाक मारली,

" उषा ! उषा देशपांडे ! "

ती तरुणी थांबली आणि कावेरीजवळ जाऊन निरखून पाहिल्यासारखें करीत म्हणाली,

" कावेरी ! खरंच ! विश्वास नाहीं बसत माझा ! "

" होय ! मीच ती हतभागी कावेरी ! " तिला वाटलें, आपल्याला रडूं येणार.

ही असें काय करते आहे हें न समजून उषेनें विचारलें, " म्हणजे? मी नाहीं समजलें ! कुणाबरोबर आली आहेस तूं? "

" कुणी नाहीं ! "

" मग काय एकटीच ? "

" हो ! "

" कुठें उतरणार आहेस ? "

" कुणास ठाऊक ? तुझ्याकडे येऊं? "

" हो ! चल ना ! किती वर्षांनीं भेटतोंय् आपण. खूप श्रीमंत झालेंय मी ! आनंदानें चल. पण चालेल ना माझ्याकडचं? परभू आहें मी ! "

कावेरी तो विनोद कळण्याच्या मनःस्थितींत कोठें होती ! तिच्या हातावर डोकें टेकीत तिनें म्हटलें, “ कुणीही अस. माणूस आहेस ना ? ”

हिनें असें कां म्हणावें तें उषेला कळलें नाहीं. फारा दिवसांनीं आपली बालमैत्रीण कावेरी आपल्याला भेटते आहे, एवढेंच तिला ठाऊक झालें होतें. तिच्या वागणुकीचा कांहींच उलगडा उषेला झाला नाहीं. पण मग तिनें ठरविलें, ‘ हिला घरीं न्यावी नि मग विचारावं सावकाश. ’

सोबत नि तीही एका प्रेमळ बालमैत्रिणीची ! कावेरीला केवढा आनंद झाला होता ! बाहेर मोटारींत येऊन बसेपर्यंत तिला वाटत होतें, ‘ आपण स्वप्नांत तर नाहीं ना ? ’

आणि ती उषा देशपांडेच्या घरीं उतरली तेव्हां तो भव्य बंगला नि तिची जागा पाहून तिच्या मनांत आलें, ‘ आपण आलों आहों खऱ्या ! पण पुढें काय होणार ? ’

पण पुढें काय होणार हें माणसाला कळत नाहीं, म्हणूनच तो सुखी नसतो का ?

---

## २

कावेरी पुण्याला आल्याला आठ दिवस होऊन गेले होते. उषेकडेच ती राहिली होती आणि त्याला कारणेंही तशींच होतीं. एक तर उषेचा पेशा सिनेमानटीचा असल्यामुळें तिच्याकडे गांवांतील रिकामटेकड्या चौकशा करणाऱ्या पांढरपेशा स्त्रिया जमण्याची भीति नव्हती आणि दुसरें म्हणजे गांवापासून थोडेंसें दूर नि धनिक अशा वस्तींत खूप मोठा ब्लॉक घेऊन ती राहात असे. त्यामुळें जागेचीही अडचण नव्हती.

सिनेमा धंद्यांत वावरावें लागल्यामुळें उषेला मानवी स्वभावाचें बरेंचसें ज्ञान झालें होतें कीं काय कोण जाणे ? पहिले दोन दिवस तिनें कावेरीला कांहींच विचारलें नाहीं. जणूं कांहीं कावेरी तिच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून तिच्याकडे गेली आहे अशाच धोरणानें ती कावेरीशीं वागत होती आणि तशाच सहानुभूतीची कावेरीला अपेक्षा नव्हती काय ?

तापलेली काच आपोआप थंड होऊं देण्यांत शाहाणपणा असतो. ती गार व्हावी म्हणून तिच्यावर कोणीं पाणी ओतलें, तर हाताला फक्त तुकडेच लागायचे!

सुख काय, अगर दुःख काय, ती अशी एक भावना आहे, कीं ती दुसऱ्या प्रिय माणसाजवळ बोलली असतां वाढते अगर कमी होते. एक दिवस जेवण झाल्यावर सुखदुःखाच्या गोष्टी बोलत असतां कावेरीनें तिला सारी हकिगत सांगितली नि म्हटलें, "मी केलं तें ईश्वराला आवडलं असावं. तसं नसतं तर तुझी स्टेशनवर नेमकी भेट कशी झाली असती? आणि तूं भेटली नसतीस तर या अनोळखी पुण्यांत माझं काय झालं असतं कोण जाणे? त्यांतून मी आशिक्षित. शिकलेल्या स्वतंत्र स्त्रीचं आयुष्य किती सुखाचं असतं हें मी गेले पांचसात दिवस तुझ्यावरून पाहात आहें. मात्र एक कर, मी कोण हें कुणाला सांगूं नकोस. कसं होईल कोण जाणें?"

उषेनें तिला गप्प करीत म्हटलें, "जाऊं दे! झालं गेलं विसर! तुझ्या सहनशक्तीची, तडफेची नि धारिष्ट्याची मला कमाल वाटते. प्रसंग माणसाला शाहाणं करतो, हेंच खरं! मी या व्यवसायांत पडलें तीही प्रसंगानेंच...... ...... गुपितं कशीं राखावींत हें आम्हां सिनेमा नटींच्या इतकं कुणालाच कळत नाहीं. तूं निर्धास्त अस."

आणि तिनें सांगितलेली स्वतःची हकिगत कोचावर पडल्या पडल्या कावेरी स्वतःशींच आठवत होती. स्टूडिओंत महत्त्वाचें काम असल्यामुळें उषा सकाळीं नऊ वाजतांच तिकडे गेली होती. जाण्यापूर्वी पातळ बदलून तोंडावर पॉवडर-पफ मारीत असतांना तिनें कावेरीला म्हटलें होतें,

"फार महत्त्वाचा सीन आहे आज! माफ कर हं! गेलंच पाहिजे!"

"नाहीं गेलीस तर?"

"एरव्हीं राहिलें असतें ग. पण...फारच महत्त्वाचा सीन आहे आज आणि फिल्म महाग झाल्यापासून वेळ नि पैसा फुकट दवडायचा नाहीं असं ठरवलंय. नको का जायला मग? मीं बाईला सांगितलंय. माझा गडी येईल त्याच्या बरोबर त्या डबा देतील. तूं मात्र खोळंबूं नकोस. जेवून घे."

आणि त्याप्रमाणें जेवण करून कावेरी स्वस्थपणें कोचावर पडली होती.

पहिले कांहीं दिवस चाललेला तिच्या मनाचा गोंधळ अजूनही पूर्णपणें

थांबला नव्हता. उषेच्या जागेची ती भव्यता नि अद्ययावत् टापटीप पाहून तिला वाटे, ' आपण शोभूं तरी का या जागेला ? ' त्या खुर्च्या, टेबलें, पायाच्या छोट्या कुंड्या, तसबिरी, प्रसाधनें, सारें पाहून तिला भांबावल्यासारखें होई. कोंकणांतलें तिचें सारें आयुष्य फाटक्या सुतड्यावर झोपण्यांत गेलें होतें. सासरींही थोड्याफार प्रमाणांत तीच अवस्था होती आणि म्हणूनच उषेच्या निजायच्या खोलींतील तो भारी पलंग, मऊ मऊ गाद्या, उशा, मच्छरदाणी, प्रकट उत्तान शृंगार दाखविणाऱ्या दोनतीन तसबिरी, सारें पाहून तिच्या मनांत येई, ' सुखाच्या या विलक्षण कैफानें आपण गुदमरून तर जाणार नाहीं ? '

राहून राहून तिला वाटे, ' शाळेंत जेमतेम पास होणारी उषा, इतक्या वैभवाची मालकीण झाली तरी कशी ? आणि या सिनेमाच्या धंद्यांत ती शिरली कशी ? '

सिनेमाचा धंदा चांगला अगर वाईट, कुलीन स्त्रियांनीं त्यांत जावें कीं नाहीं, याबाबत तिला कांहींच मत देतां आलें नसतें. आयुष्यांत बोलपट असे तिनें एकदोनच पाहिले होते आणि तेही ' अयोध्येचा राजा ', ' संत तुलसीदास ', ' तुकाराम ' असले पौराणिक. पण त्यांवरून तिचें अशिक्षित मन सिनेमा धंद्याबद्दल फारसें प्रतिकूल झालें नव्हतें खास ! तिच्या लहानपणीं तिच्या गांवांत केसरी व इतर एकदोन पत्रें येत त्यांत कधीं कधीं ती वाची, ' सिनेमांत बायकांनीं काम करूं नये ! ' तिला मोठें नवल वाटे; सिनेमांत खऱ्या बायका काम करीत असतील यावर तिचा विश्वासच नव्हता. गांवांतले भंडारी वर्षांतून एकदा नाटक करीत. तिची समजूत होती, सिनेमांतही असेंच असेल.

उषा देशपांडे तिच्या गांवांत तिच्याच आळींत राहात असे. त्यांच्या घरची कांहीं फारशी श्रीमंती नव्हती. घरचें थोडेंसें उत्पन्न होतें. तिचा बाप सारा दिवस विड्या फुंकीत गांवांत हिंडत असे.

धाकट्या भावंडांचें लेंढार सांभाळतां सांभाळतां उषेला नको होई. जरा रिकामा वेळ मिळाला, म्हणजे ती कावेरीकडे धावत येई. सावत्र आईच्या त्रासाला कंटाळलेल्या कावेरीला उषेचें आगमन द्रौपदीच्या हाकेला संकटकालीं धावून जाणाऱ्या कृष्णाप्रमाणें वाटे. दोघीही हिंडायला म्हणून

समुद्रतीरावर जात. पुळणीवर खेळत, धावत, गप्पा मारीत, घरच्या सुखदुःखाच्या कथा सांगत, गाणीं म्हणत. गाणीं म्हणण्याचा बराचसा वांटा उषेकडेच असे. ती दिसायला चांगली होती नि तिचा आवाजही सुरेल नि भरदार होता.

एक दिवस गप्पा मारतांना कावेरीकडे जराशा तुच्छतेनें पाहात उषेनें म्हटलें,

" उद्यां आमच्याकडे कोण येणार माहीत आहे ? "

" नाहीं. कोण बाई ? "

" सांग बघूं. "

" मला नाहीं बाई आठवत. येणार असतील कुणी पाहुणा ! "

" इश्य ! तसं नाहीं कांहीं. "

" मग ? "

" अग, आमचा शामूमामा यायचाय. मुंबईला असतो तो. "

" हं ! तो उंचेला नि भांग पाडणारा ? "

" हो, तोच. छान आहे नाहीं ? सिनेमांत काम करतो तो. मी परवां मुंबईला गेलें होतें तेव्हां पाहिला त्याचा सिनेमा. अग, अगदीं आपल्या माई–आक्कांसारख्या बायका असतात तिथें. पण दिसतात मात्र त्यांच्याहून छान हं ! काय गंमत म्हणून सांगूं त्या बायकांची ? भारी भारी कपडे काय, गडी काय ! मी सांगणाराय मामाला, तूं परत जाशील, तेव्हां मलाही घेऊन जा ! मला नाहीं आवडत कोंकण. कशी छान आहे मुंबई ! "

उषेनें सहज म्हटलेले शब्द खरे झाले होते. तिनें आपल्या मामाबरोबर मुंबईला जाण्याचा हट्ट घेतला. " बरी जातीय ! शिकेल तरी मुंबईत नि तेवढंच एक माणूस कमी घरांत खायला " या हिशेबानें वडिलांनींही हरकत घेतली नाहीं.

उषा मामाबरोबर मुंबईला गेली. शिक्षणाची मजल इंग्रजी पांचवीपुढें नाहींच जाऊं शकली. उलट मामाच्या घरच्या नाटकी वागणुकीमुळें गाणें, पेटी वाजविणें, छान छान पोषाख करून चौपाटीवर हिंडायला जाणें, वर्गांतल्या चार श्रीमंत चैनी मुलींबरोबर गांवांत लागलेल्या बोलपटाच्या

गुणावगुणांवर चर्चा करणें, संमेलनप्रसंगीं नाटकांत काम करणें, या गोष्टींत मात्र ती चांगलीच पटाईत झाली होती.

'आणि तिला सिनेमासृष्टींत प्रवेश मिळाला, तोही मोठ्या विचित्र योगायोगानें. ज्या फिल्मकंपनींत तिचा मामा काम करीत होता, ती कंपनी एक भक्तिरसप्रधान बोलपट काढणार होती. त्या कथेला शोभेल अशी, धड पोर नाहीं नि धड तरुण नाहीं अशी पोरपण आणि तारुण्य यांच्या सीमेवर उभी असलेली एक तरुण मुलगी त्यांना नटी म्हणून हवी होती. तशी एक मुलगी त्यांना मिळालीही होती. पण... चित्रपट थोडासा चित्रित होतो न होतो तोंच एक छोटासा अपघात होऊन ती मुलगी कामाला नालायक ठरली होती.

कंपनीच्या चालकांपुढें प्रश्न पडला. आयत्या वेळेस नटी आणायची कोठली? पण......तो योग अचानक जमून आला नि रजतसृष्टींत उषादेवींचें आगमन झालें.

एक दिवस आपल्या मामाबरोबर अशीच ती स्टूडिओंत गेली होती. डायरेक्टरनीं तिला पाहातांच टाळी वाजवून म्हटलें, "बस्स ! अगदीं योग्य ! A nice Screen appeal ! काय शामराव, करणार का करार ?"

शामरावांनाही प्रश्नच पडला होता. म्हणजे ते तयार होते, पण त्यांना भीति होती, उषेचे वडील काय म्हणतील ? अर्धवट चांचरत त्यांनीं म्हटलें, "अं, तशी हरकत......"

तोंडांतला पाईप जरासा जोरांत ओढल्यासारखें करीत डायरेक्टरनीं म्हटलें, "पण...पण...काय ? हो म्हणा. तुमचा पगार वाढवूं." आणि खरोखरच मॅनेजरना हाक मारून त्यांनीं सांगितलें, "हें पाहा कवठीकर, शामरावांचा पगार शंभर करण्याबाबत मला या महिनाअखेर आठवण करा. आणि ही नवी बालनटी, उषादेवी. यांच्याबद्दलचे राइट् अप्स तयार करून रवाना होऊं द्यात. यांना दरमहा २५० रुपये द्यायचं ठरवलंय मीं. काय उषाताई, येणार ना ?"

उषेला काय? तिला वाटलें, 'डायरेक्टरच्या रूपानें देवच आलाय. दरमहा २५० रुपये ? कुठें ठेवायचे इतके ? कावेरीच्या भाऊंची शाळा तपासणाऱ्या इन्स्पेक्टरना सुद्धा नसेल इतका पगार.'

स्वतःचा पगार वाढून शिवाय उषेचा पगार घरीं येणार होता. शामराव कशाला अडथळा करील ? आणि २५० रुपयांतले ५०-७५ रुपये घरीं तिच्या वडिलांकडे पाठविले तर ते तरी कां म्हणून नकार देतील ?

त्या दिवसापासून उषेनें कलाप्रांगणांत पाऊल टाकलें. शाळा सुटली, पण त्याचें तिला कांहींच वाटलें नाहीं. उलट बरेंच झालें. शाळा असतांना निदान सुटींत तरी कोंकणांतल्या त्या गांवढ्या गांवांत जाऊन बावळट भावंडांचें काम करावें लागे.

आतां काय ? वेळच कोठें होता ? नि असला, तरी ज्या गांवांत सिनेमा नाहीं, हॅटेल्स नाहींत, 'उषाबाई, फार मारू दिसतां बुवा !' म्हणून म्हणणारे सेवक नाहींत, त्या गांवाला जाऊन करायचें काय ?

अवघ्या चार वर्षांत एक बऱ्यापैकीं नटी म्हणून तिचा बोलबाला झाला होता. कोणत्या कंपनीला अभिवचन देऊन कोणत्या कंपनींत जायचें, पगाराच्या अटी घालतांना आगाऊ किती रक्कम घ्यायची, अमूक अमूक गोष्टी नि अभिनय मी करणार नाहीं, अशा अटी कशा घालायच्या, अमूकच डायरेक्टर नाहीं तर मेक-अप् मास्तर पाहिजे म्हणून ताणून धरून स्वतःची किंमत कशी वाढवावयाची, ह्या साऱ्या कलांत ती निष्णात झाली होती.

पुण्याला नवीनच निघालेल्या कांहीं हौशी श्रीमंतांनीं स्थापन केलेल्या एका चित्रसंस्थेंत भरपूर मोठ्या पगारावर तिचा चार वर्षांचा करार झाला होता आणि म्हणूनच ती कावेरीला भेटूं शकली होती. बाकी इतके दिवस ती पुण्याला होती, अगर अनेक ठिकाणीं तिचे फोटो छापून आले होते, तरी वाचनाची फारशी आवड नसलेल्या नि खेडेगांवांत राहिल्यामुळें सिनेमाजगत् हें काय आहे, हें माहीत नसणाऱ्या कावेरीला ती कशी माहीत व्हावी ? आणि म्हणूनच याबाबत उषेनें तिला एकदा विचारलें असतांना ती म्हणाली होती, "योगायोगावर माझा फार मोठा विश्वास आहे. ज्या विचित्र योगानें माझा कांहींही अपराध नसतां असलं सासर मला मिळालं त्या योगायोगानेंच तुझी नि माझी भेट झाली."

कंपनीचे डायरेक्टर कांहीं महत्त्वाची यंत्रसामुग्री खरीदण्यासाठीं व सरकारी अधिकाऱ्यांची गांठ घेण्यासाठीं मुंबई व दिल्लीला जाणार होते.

स्टूडिओंत इतर कामें चालू असलीं, तरी शूटिंग नसल्यामुळें प्रमुख नटांना कांहींच काम नव्हतें. ' नयनकुमार ' नांवाच्या, कंपनींत आलेल्या एका नव्या उमद्या तरुणाबरोबर विश्रांतीसाठीं म्हणून उषा बेळगांवला गेली होती. ' शिग्रेट ओढणारी हीच ती बया ' म्हणून गाडींतल्या म्हातारीनें उषेकडे बोट दाखविल्याचें कावेरीला माहिती होतें. बायका सिगरेट ओढतात? सगळ्या? कीं सिनेमांतल्या? निदान त्या म्हातारीच्या सांगण्याप्रमाणें उषेनें ओढली होती खरी. बाकी त्याला तरी काय पुरावा होता म्हणा! चार आठ दिवसांच्या कालावधींत तिनें उषेला सिगरेट ओढतांना कधीं पाहिलें नव्हतें. सभ्य स्त्रीच्या आयुष्यक्रमाला गालबोट लावील असें कोणतेंच कृत्य उषेकडून घडल्याचें तिला आठवत नव्हतें. उलट रोज आंग धुणें झाल्यावर आंतल्या खोलींत लावलेल्या श्रीलक्ष्मीनारायणाच्या फोटोला हार घालण्याची तिची पद्धत तिनें पाहिली होती.

उषा बोले तरी किती गोड नि लाघवी! वास्तविक कावेरी कोठली कोण? एक अशिक्षित, जुनाट वळणाची, वेड्या नवऱ्याची, सासरहून पळून आलेली, अपमानित खेडवळ स्त्री! जुनी मैत्रीण असली म्हणून काय झालें? जुनीं वचनें नि जुने मित्र! दोन्हीही गोष्टी परिस्थिति पालटलेला माणूस सहज विसरूं शकतो. काय म्हणून तिनें कावेरीला आश्रय द्यावा?

अशा तऱ्हेनें मनांत विचारांचा गोंधळ उडाला म्हणजे कावेरीला प्रश्न पडे, ' काय वाईट आहे हिच्या वागण्यांत? किती प्रेमानें आणि आपले-पणानें बोलते! हें सगळं दिसत असतांना कसं वाईट म्हणायचं हिला? आतां सिनेमांत आहे, तेव्हां वागत असेल इतर बायकांहून निराळी! पण...... '

तिचें पुराणसंस्कारी मन उषेला एकदम चांगली म्हणायला तयार होईना. कारण चांगली म्हणावें, तर आपल्या व्याख्येंतल्या कोणत्याच सभ्य स्त्रीच्या कोष्टकांत ही बसत नाहीं. थोडक्यांत, तिच्या मनाचा गोंधळ उडे.

आणि तसा तिच्या मनाचा गोंधळ उडाला असता, तर तो अस्थानीं होता असेंही म्हणतां आलें नसतें. सकाळीं आठ साडेआठच्या आंत आंथरुणांतून उठलेल्या उषेला तिनें कधीं पाहिली नव्हती. ती उठायची नि तोंड वगैरे धुतलें, कीं गड्यानें आणून दिलेला चहा, केक्स हा आहार व्हावयाचा.

खूप मोठ्या बिलोरी आरशासमोर होणारी केशभूषा नि मग जवळजवळ अर्धा पाऊण तास स्नानगृहांतलें मनसोक्त स्नान! त्यानंतर पुन्हा करण्यांत येणारे शृंगारसाज नि मग स्टूडिओ! ती संध्याकाळीं साडेसहाला परत येई असेंही नाहीं. एकदा दोनदा तर ती रात्रीं बारा एक वाजतां परत आली होती. कावेरीच्या डोक्यांत आलें होतें, हिला एकदा विचारावें, 'करतेस तरी काय तूं इतका वेळ?'

दुपारीं घरीं कोणीच नसलें म्हणजे मग कोचावर पडल्या पडल्या कावेरीच्या डोक्यांत असलेच विचार सुरू असत नि असले विचार करून कंटाळा आला, म्हणजे मग ती उषेच्या खोलींतील फोटो पाहात बसे.

कांहीं नाहीं तरी उषेचे ५०।७५ फोटो होते. डाव्या बाजूला मान केलेला, उजव्या बाजूला पाहात असलेला, हसरा, शृंगारसाज करून प्रियकराची वाट पाहात असलेला, केशमुक्ता, पठाणी, मारवाडी, गुजराथी, मद्रासी नि दाक्षिणी पोशाखांतला; विजार, कोट असा पुरुषी वेशांत काढलेला नि एक तर..........उषेनें स्वतःच तो तिला दाखवला होता. स्नानानंतर ओलेत्या वस्त्रानिशीं काढलेला होता तो. पाहातां पाहातां कावेरीला लाजल्यासारखें झालें.

"लाजलीसशी!" उषेनें तिला विचारलें.

"शीः! आवडले तुला असले फोटो?"

"हो! न आवडायला काय झालं? काय वाईट आहे?"

"काय वाईट आहे? कुठला तरी फोटो घेणारा नि त्याच्यासमोर तूं असं उभं राहावंस हें..."

खूप मोठ्यानें हसून तिच्या पाठीवर थाप मारीत उषेनें म्हटलें, "हा वेडे! अग वाटेल त्या माणसासमोर का उभं राहातात असं? आपल्याला हवं त्या."

"म्हणजे?"

"म्हणजे काय? नयनकुमारांनीं काढलाय तो मोठ्या हौसेनें. तुला ठाऊक आहेत नयनकुमार?"

"नाहीं बाई ऽ!"

" वा! अग, दोनतीन बोलपटांतच कामं केलींत त्यांनीं! पण असं नांव मिळवलंय! नयनकुमार हें कांहीं खरं नांव नव्हे त्यांचं. खरं नांव दुसरंच आहे. त्या दिवशीं प्रथम पुणें स्टेशनवर तुझी माझी भेट झाली, तेव्हां माझ्या बरोबर होते ना, तेच नयनकुमार."

पण कां कोण जाणे, उषेनें अशा तऱ्हेचा स्वतःचा फोटो एका परक्या तरुणाला घेऊं द्यावा, हें कांहीं कावेरीला मनापासून आवडलें नाहीं.

उषेचे आणखीही फोटो बाहेरच्या हॉलमध्यें टांगलेले होते. कांहीं पूर्वींच्या सिनेमा-प्रसंगांतले, कांहीं स्वतंत्र. पण प्रत्येक फोटोंत उमलत्या गुलाब कलिकेप्रमाणें उषा दिसत होती खरीच.

आणखी चार आठ दिवस गेल्यानंतर मात्र कावेरी कंटाळली. किती दिवस दुसऱ्याला त्रास द्यायचा, हा विचार तिला सारखा भेवडावून सोडी. एक दिवस जेवतांना ती म्हणाली,

" किती त्रास तुला माझ्यामुळें?"

" वेडे, त्रास कसला त्यांत? राहा ना? तुला आवडणार नाहीं म्हणून, नाहीं तर विचारलं असतं, येतेस का आमच्या कंपनींत?

" छे! भलतंच! एक तर मला कांहीं येणार नाहीं नि दुसरं म्हणजे, मला कुणी ओळखूं नये, ही इच्छा आहे माझी. त्यापेक्षां एखादं हलकंसं, पण फारसा गाजावाजा न होणारं काम मला मिळालं तर बघ."

" बरं बरं. राहूं दे तें. पाहूं आपण पुढें."

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं उषा स्टूडिओंतून घरीं आली ती जवळ जवळ ओरडतच. तिनें हातांतलें वृत्तपत्र कावेरीच्या अंगावर फेकीत म्हटलें, " हें घे, वाच!"

असेल कांहीं सिनेमाविषयक तिच्याबद्दल लिहिलेलें, अशा समजुतीनें तिनें तें दैनिक उघडलें आणि एका बातमीवर तिची नजर खिळली.

बातमी अशी होती—

### × × × × × चें बातमीपत्र

[ आमच्या बातमीदाराकडून ]

" गेल्या आठवड्यांत येथें एक बिस्मयजनक गोष्ट घडून आली आणि ती म्हणजे गांवांतील एक प्रतिष्ठित नागरिक, श्रीमंत आबासाहेब इनामदार

यांच्या स्नुषेचें बेपत्ता होणें. सातआठ दिवसांपूर्वी ती घरांतून एकाएकीं नाहींशी झाली म्हणतात. या बातमीनें साऱ्या गांवाला धक्का बसला असून जो तो आपापल्या परीनें तर्क लढवीत आहे. एक गोष्ट मात्र प्रत्येकाच्या तोंडीं ऐकूं येते नि ती म्हणजे घरांत तसें कांहीं कारण घडलें नसावें. कारण त्या नाहींशा झाल्या त्याच दिवशीं संध्याकाळीं, आपले धाकटे दीर चंद्रकांतराव, ह्यांच्याशीं मनमोकळेपणानें हास्य विनोद करीत होत्या. त्यांच्या नाहींशा होण्यानें त्यांचे पति केशवराव यांची तबियत एकाएकीं बिघडली असून त्यांच्या मेंदूवर परिणाम होईल कीं काय अशी डॉक्टरना भीति वाटत आहे. चंद्रकांतना तर मातृवियोगाचें दुःख होत आहे. प्रत्येकजण इनामदारांकडे येऊन झाल्या प्रकाराबद्दल सहानुभूति व्यक्त करीत आहे."

चीड येऊन तिनें त्या पत्राचा चोळामोळा केला. जणूं काय तिचा सासरा नि दीर, यांनाच ती शासन करीत होती. तिला राग आला होता त्यांच्या खोटेपणाचा ! पत्नीच्या पळून जाण्यामुळें केशवरावांचें डोकें बिघडलें असें ध्वनित करून त्यांनीं कमालीचा नीचपणा व्यक्त केला होता. जणूं कांहीं ती पळून जाण्यापूर्वी तो अगदीं व्यवस्थित होता !

संतापातिरेकानें तिला बोलवेना. उषेच्या छातीवर डोकें टेकीत नि अश्रु गाळीत तिनें म्हटलें, "किती नीच आहेत ग हे लोक ? चंदूला म्हणे आई गेल्याइतकं दुःख झालंय् ! संध्याकाळीं एकटी असहाय गांठून कोळशाच्या खोलींत आईचा हात धरतात होय कुणी ? नीच ! ......उषाताई ! कसं होणार ग माझं ?" तिला अधिक बोलवेना. आपल्याला खूप रडूं येणार कीं काय, असें तिला वाटत होतें. उषेनें तिला अगदीं जवळ ओढलें. पदराच्या शेवानें तिच्या डोळ्यांतले अश्रु टिपले नि तिला थोपटल्यासारखें करीत म्हटलें,

"गप्प राहा तूं ! उद्यां पाहूं आपण ! कदाचित् तुझ्याजोगं काम मिळेलही. आमच्या कंपनीच्या संचालकमंडळांत एक प्रतिष्ठित व्यापारी गृहस्थ आहेत माणिकराव जोशी म्हणून. त्यांची पत्नी आजारी आहे. तिची किरकोळ शुश्रूषा करायला त्यांना एक बाई पाहिजे आहे असं मला ते म्हणत होते. ते कलकत्त्याला गेले आहेत. चार दिवसांनीं आले, म्हणजे मग विचारीन त्यांना मी."

" पाहा ! खरंच पाहा ! कुठें तरी मार्गाला लागलें तर सुटेन तरी यांतून. नको झालंय् मला."

आणि दुसरा दिवस उजाडला तरी कावेरी बेचैन होती. आदल्या दिवशीं वाचलेला तो मजकूर, त्यांतलीं तीं खोटीं विधानें, सारें तिला असह्य होत होतें. आपलें आंग दुखतें आहे, डोकें जड झालें आहे नि आपल्याला सपाटून ताप भरणार कीं काय, अशी भीति तिला वाटूं लागली. सारा दिवस ती निपचित पडून होती. दुपारीं जेवण सुद्धा नीट गेलें नाहीं.

संध्याकाळीं उषा घरीं आली, म्हणजे कोयनेल, काढा असलें कांहीं तरी औषध घेऊं, असें तिनें मनाशीं ठरवलें होतें. पण.........

उषा घरीं आलीच नाहीं. कंपनींतला एक नोकर फक्त चार ओळींची चिठ्ठी घेऊन आला होता.

" माझी वाट पाहूं नकोस. डायरेक्टरांबरोबर मी एका पार्टीला जात आहें. कदाचित् एक दीड वाजतां परत येईन, कदाचित् येणारही नाहीं तूं जेवून घे नि झोप."

तिला जेवायचें नव्हतेंच. बाईनीं पुष्कळ आग्रह केला पण तिची अन्नावर इच्छाच नव्हती. अखेरीस दोन कप गरम कॉफी तिनें घेतली आणि स्वयंपाकाची बाई, गडी निघून गेल्यानंतर दाराला कड्या वगैरे पाहून ती आडवी झाली.

आंग दुखत असल्यामुळें तिला गाढ झोप लागली नाहींच. जी लागली ती भारावलेली नि अर्धवट !

साधारण बाराचा सुमार होता. कोणी तरी हाक मारतें आहे असा भास झाल्यामुळें ती जागी झाली. तिचा अंदाज बरोबर होता. दाराशीं आलेल्या व्यक्तीनें कॉलबेल इतक्या जोरानें दाबली होती, कीं गप्प् म्हणून दटावलें असतांनाही दुप्पट जोरानें केंकाटणाऱ्या हट्टी मुलाप्रमाणें घणाऽऽण...घणाऽऽण असा तिचा आवाज सारखा चालूच होता.

उषा आली असावी अशा समजुतीनें तिनें जरासे हेल काढून म्हटलें, " आलें हं ! थांब ! " आणि ती उठली. चालतांना झुकांड्या जात होत्या. केसांच्या बटा कपाळावर आल्या होत्या. पदर खालीं गळला होता. पण

तो नीटनेटका करण्याइतका उत्साह तिला वाटत नव्हता आणि जरासा अस्ताव्यस्त असला तरी काय हरकत होती? उषाच तर येणार होती!

तिनें दार उघडलें आणि म्हटलें, "याऽऽऽवं!"

पण.........दुसऱ्याच क्षणाला ती मागें सरली. आंत येणारी व्यक्ति उषा नव्हती. तो–ज्याला तिनें प्रथम पुण्याच्या स्टेशनवर उषेबरोबर पाहिलें होतें, त्यानंतरही जो दोन चार वेळां उषेकडे आला होता तो–नयनकुमार होता.

त्याच्या अंगावर उंची सूट होता. पण कांहीं ठिकाणीं त्यावर कसले तरी डाग पडले होते. कपड्यांना जो एक उग्र सुगंध त्यानें लावला होता, त्याच्या वासानें सारी खोली भरून गेली होती. चालतांना त्याचीं पावलें वेडींवाकडीं पडत होतीं.

शेजारच्या कोचाचा आधार घेत कावेरीनें त्याला विचारलें, "कोण पाहिजे तुम्हांला? उषाताई बाहेर गेल्या आहेत."

कांहींच न बोलतां विचित्र हातवारे करीत त्यानें उंबरठ्यावरच बैठक मारली आणि अडखळत म्हटलें,

"हव्येय कुणाला उषा? साऱ्या गांवाबरोबर पळणारी उनाड मैना ती! तुझ्यासारखी असतांना......... ती आज इथें नाहीं हें मला माहीत होतं, म्हणूनच ........."

आणि त्यानें खरोखरीच कावेरीच्या हाताला हात घातला. पण तिनें चटकन हात सोडवून घेतला नि ती जिन्याच्या चौकटींत आली.

पुन्हा कपडे सारखे करीत नयनकुमार तिच्या जवळ आला आणि तिच्या तोंडाजवळ त्यानें आपलें तोंड नेलें.

वसकन् कसली तरी घाण आल्यामुळें कावेरीनें आपलें तोंड मागें वळवलें.

खूप मोठ्यानें हसून त्यानें म्हटलें, "इतकी घाबरतेस वासाला? उषा तर बाटल्याच्या बाटल्या उडवते. चल ये, मी शिकवतों तुला."

खरोखरीच त्यानें तिच्याशीं लगट करायला सुरुवात केली. गलितगात्र झाली असूनही कावेरीला कोठून एवढा जोर आला होता कोण जाणें, तिनें त्याला किंचित् जवळ येऊं दिलें आणि अशा कांहीं जोरांत ढकललें, कीं तो जिन्यावरून गडगडत जाऊन खालीं पडला.

त्याचें काय झालें तें कावेरीनें पाहिलेंच नाहीं. ती आंत गेली नि तिनें दार इतक्या घट्ट लावून घेतलें, कीं पुन्हा तो परत आला असता तरी त्याला तें उघडलें नसतें.

'सुटलें!' असा निश्वास टाकून ती कोचावर बसली. काय विचित्र नशीब होतें तिचें! पंधरा दिवसांत हा दुसरा प्रसंग! अनाथ स्त्रीनें अब्रूनें जगावें हें पसंतच्च नाहीं कीं काय समाजाला?

असल्याच विचारांत ती जागी होती, ती जवळ जवळ उषा परत येईपर्यंत. आणि उषा परत आली तेव्हां तिच्या जिवांत जीव आला. किती तरी वेळ झाला प्रकार ती उषेजवळ सांगत होती.

अखेरीस उषेनें सांगितलें, "माझं डोकं जरासं चढलंय. झोपतें मी आतां. हे सिनेमावाले लोक असेच असतात नि दारू घेतल्यावर तर त्यांना कांहींच शुद्ध राहात नाहीं. तूं मनावर घेऊं नकोस. असंच चालायचं."

कावेरीला कांहीं कळेच ना. 'असंच चालायचं म्हणजे काय? झाल्या प्रकाराला उषेची संमति होती कीं काय? आणि तीही खूप दारू पिते म्हणून तो मवाली म्हणत होता. तसं असेल, तर ज्या गोष्टीसाठीं आपण घर सोडलं, ती सांभाळणं कठीण होईल. शक्य तितक्या लवकर इथून निघालंच पाहिजे.'

अखेरीस आठ दिवसांनीं ज्यांच्याकडे तुला नोकरी देतें म्हणून उषेनें कावेरीला सांगितलें होतें, ते कंपनीच्या संचालक मंडळांतील एक संचालक श्री. माणिकराव जोशी पुण्याला परत आले होते आणि आज शूटिंग पाहायला ते कंपनींत येणारही होते. नव्हे, तशा अर्थाची चिठ्ठी त्यांनीं उषेला पाठविली होती नि लिहिलें होतें, "ज्या बाईंना तुम्ही आमच्या इथल्या नोकरीबद्दल सांगितलं होतंत त्यांना घेऊन आलांत तर फार मेहेरबानी होईल."

"माझ्याबरोबर तुला आज कंपनींत यायचंय्. मी सांगतें तसा पोशाख कर" म्हणून उषेनें स्वतः कावेरीला सजविली होती.

जुन्या पद्धतीनें केसांची वेणी घालणाऱ्या कावेरीला सैलसा मानेवर रुळणारा आंबाडा घालतांना किती लाजल्यासारखें झालें होतें! तिच्या

केसांचे पेड वळतांना उषेनें म्हटलें, “किती नाजूक, लांबसडक नि मऊ आहेत ग तुझे केस? मोकळे टाकून केसांच्या तेलासाठीं कॅलेन्डरवर फोटो दिलास तर वाटेल तितके पैसे मिळतील तुला.”

कावेरी फक्त लाजली.

किरमिजी रंगाचें पातळ उषा तिला गोल नेस म्हणून म्हणत होती; पण तिनेंच तें नाकारलें नि तसलाच ब्लाऊज घालून निशिगंधाच्या फुलांची वेणी डोक्यांत घालून तिनें आरशांत पाहिलें, तेव्हां तिचा तिच्यावर विश्वासच बसेना. “कावेरी इतकी मोहक असेल? मी इतकी का सुंदर आहें?”

उषेनें तिच्याकडे आपादमस्तक न्याहाळून पाहिलें आणि म्हटलें, “मीं या घटकेला पुरुष असतें तर काय केलं असतं माहीत आहे?”

“नाहीं बाई. काय केलं असतंस?”

एक पाऊल पुढें टाकीत ती कावेरीजवळ आली. तिचा हात तिनें हातांत घेतला नि म्हटलें, “तुला अशी ओढून जवळ घेतली असती नि तुझं असं.........”

खरोखरीच तिनें कावेरीला जवळ ओढून तिचें चुंबन घेतलें.

तिच्या केसांचा येणारा मादक सुगंध, नितळ चेहेरा, शरीराचा सुखद स्पर्श, कावेरीला लाजून नको झालें. तिनें उषेच्या बाहुपाशांतून आपली सुटका करून घेतली आणि म्हटलें, “काय हें?”

“अग काय कसलं? आमचे डायरेक्टरसाहेब इतके खूष होतील, तुलाच करतील पुढल्या बोलपटांत नायिका.”

“खरंच? मग नको गडे! मी आपली साधीच येतें. बाईची नोकरी मागायला जायचंय् मला. नटीची नव्हे.”

उषेनेंही हरकत घेतली नाहीं. कारण अयथावत् वेषभूषा केलेली कावेरी इतकी मोहक दिसत होती, कीं उषेला खरोखरच भीति वाटली.

‘न जाणों! आपण अशी हिला नेली तर हीच पसंत व्हायची नि आपला बाजा वाजायचा!’

कावेरीनें डोक्यांतली वेणी काढली. नेहमींचें पातळ परिधान केलें आणि ती उषेबरोबर निघाली. साध्या वेषांत सुद्धा ती आकर्षक दिसत होती.

स्टूडिओंतलें सारेंच वातावरण कावेरीला [illegible] होतें. ती उषेच्या स्वतंत्र खोलींत बसली होती. उषा आराम खुर्चीत कोणतीशी कादंबरी वाचीत पडली होती.

अखेरीला कोणीतरी नोकर आंत आला आणि त्यानें म्हटलें, “ चला उषाताई, डायरेक्टरसाहेब खोळंबून बसलेत नि मेक्-अप् मास्तर रामभाऊ अडून राह्यलेत. चला....”

उषेनें आळस दिला आणि पुस्तक खालीं ठेवीत म्हटलें, “ चल बाई, पडद्यावरचे मोहक प्रेमप्रसंग प्रत्यक्ष किती अडचणीचे असतात तें पाहा; चल. ”

दोघीही उठल्या. सेटवर चित्रीकरणाला जरूर ती सामुग्री तयार होती. कॅमेरा ट्रॉलीवर टाकून खूप पोट सुटलेला आणि बुटकासा कॅमेरामन उगीच इकडून तिकडे करीत होता. साउंड रेकॉर्डिस्ट कानांना उपकरणीं लावून जय्यत तयार होता आणि रिफ्लेक्टर धरणारीं पोरें, डायरेक्टरच्या हुकमाची वाट पाहात होतीं.

अगदीं बाजूला दोन चार खुर्च्या टाकलेल्या होत्या. त्यांपैकीं एकीवर खूप उंच, आंगानें सुटलेला आणि जरासा काळा असा एक गृहस्थ बसला होता. त्याचा उंची फार्शी फॅशनचा कोट आणि प्रमाणाबाहेर जाड असलेला खालचा ओठ तेवढ्यांतही तिच्या दृष्टींतून सुटला नाहीं. आणि एका मैत्रिणीनें सांगितलेला एक सिद्धान्त तिला आठवला, ‘ ज्या पुरुषांचा खालचा ओठ जास्त जाड असतो ते बायकांचे फार षोकी असतात.’

त्या गृहस्थाच्या शेजारीं बराचसा कृश पण पाणीदार डोळ्यांचा एक तरुण बसला होता आणि दोन खुर्च्या रिकाम्या होत्या. उषेनें सांगितल्यावरून ती अगदीं कडेच्या खुर्चीवर जाऊन बसली.

पडद्यावर दिसणारा दोघांचा प्रेम-प्रसंग घ्यायला इतक्या माणसांची जरुरी लागते ह्याचें तिला आश्चर्य वाटलें आणि तसें तें तिनें उषेजवळ बोलूनही दाखवलें. उषेनें म्हटलें, “ पाहा आतां. मी कपडे बदलून येतें. पण हो... आधींच हळूच सांगून ठेवतें तुला. तुझ्या रांगेला ते जाडे काळगेले गृहस्थ आहेत ना, तेच माणिकराव जोशी. ज्यांच्याकडे तुला नोकरी देतें म्हणून मीं म्हटलं होतं, ते. खूप मोठे व्यापारी आहेत. कंपनीची निम्मी मालकी

त्यांच्याकडेच आहे. नि दुसरे बसलेत ना? ते कथालेखक. नि हे... कॅमेऱ्याजवळ उभे आहेत, टक्कल पडलेले नि तोंडांत पाइप आहे, ते डायरेक्टर मोहनचंद्र. बरं, बस तूं. मी रंगून येतें हं."

कावेरी सारें पाहात होती. पण ती बसल्यापासून ज्यांच्याकडे ती नोकरीला राहाणार होती ते माणिकराव, आपल्याकडे पुनः पुन्हा वळून कां पाहात आहेत हें तिला समजेना. एवढा मोठा गृहस्थ! 'असं पाहूं नका' म्हणून तरी कसें सांगायचें?

उषा पोषाख बदलून आली. साधेंच काळें पातळ आणि पिवळा ब्लाऊझ. डायरेक्टर मोहनचंद्रांनीं पाइपमधून खूप मोठा धुराचा लोट सोडला आणि उषेकडे पाहून हसल्यासारखें करीत म्हटलें, "हं! काय? करायची सुरुवात?"

उषेनें म्हटलें, "हो."

आणि ती सेटवर जाऊन उभी राहिली.

मोहनचंद्रांनीं सगळ्यांना शांत राहाण्याची सूचना दिली आणि म्हटलें, "हं. उषाताई, आतां असं समजायचं, कीं दुपारची वेळ आहे नि पुस्तकं हातांत घेऊन तुम्ही कॉलेजमधून चाललां आहांत. काय? घरीं चाललां आहांत. तुम्ही आपल्याच तंद्रींत आहांत. इतक्यांत...मोटार-सायकल आल्याचा भास तुम्हांला होतो–नव्हे, खरोखरीच मोटार-सायकल येते. मोटार–सायकल चालविणारा हॉर्न वाजवतो पण त्याचा कांहींच उपयोग न होऊन तुम्ही दूर फेकल्या जातां. तो तरुणही पडतो. पण त्याला फारसं न लागल्यामुळें तो तुम्हांला उठवतो. तुम्ही चिडून त्याला शिव्या देण्याच्या बेतांत असतां, इतक्यांत त्याचं तोंड तुम्हांला दिसतं नि रागावण्याऐवजीं विस्मय नि आनंद ह्यांनीं गोंधळून जाऊन म्हणतां, 'कोण? मोहन! खरंच मोहन?' बस, इतकंच. कळलं?"

"हो!" अशा अर्थीं उषेनें मान हालविली. डायरेक्टरनीं शिटी फुंकली आणि ओरडून म्हटलें, "सायलेन्स. येस्, रेडी? स्टार्ट......"

सीनचा नंबर असलेली खडूनें लिहिलेली पाटी एका पोरानें कॅमेऱ्यासमोर धरली. फट् असा आवाज झाला. ट्रॉली फिरूं लागली.

कॉलेजांतून घरीं जाणाऱ्या तरुणीच्या आविर्भावांत उषा चालूं लागली. मागाहून एक तरुण मोटार–सायकलवरून आला; त्यानें हॉर्न वाजवला आणि...सरळ चालायचें तें उषेनें मागें पाहिलें.

आंगांत आल्याप्रमाणें डायरेक्टर किंचाळले, "कट...कट...च् अगदीं चुकलांत उषाताई तुम्हीं! अहो मागं नाहीं पाह्यचं. स्वतःच्याच नादांत चालल्यामुळें तुमचं लक्ष नाहीं असं वाटायला पाह्यजे...काय?" आणि एका हाताखालच्या कामगाराकडे वळून ते खेकसले, "गोप्या, लेका लाइट कसा देतोयस? तुझ्या बापाचे खर्च होतात काय दोन पैसे? भरपूर उजेड पडला पाह्यजे उषाताईंच्या तोंडावर."

पुन्हा शिटी, तोच फार्स.

ह्या वेळेला बरेंचसें नीट जमलें. मोटारचा धक्का लागला; ती पडली. त्यानें तिला उठवली. पण...

पुन्हा काय झालें कोण जाणें? डायरेक्टरसाहेब पुन्हा चवताळले, "लेका, कशी ओढतोयस तिला? काय कोळशाचं पोतं आहे? सिनेमांतल्या प्रियकरणीलाही उचलतां येऊं नये तुला? हात लेका, थांब मी दाखवतों."

आणि खरोखरीच उषेला पुन्हा कुशीवर पडायला लावून त्यांनीं तिच्या खाकेंत हात घालून तिला कशी उचलायची तें दोन चार वेळां दाखवलें. ह्या निमित्तानें कां होईना, त्यांनीं तिच्या छातीवर इतका दाबून हात ठेंवावा हें कावेरीला आवडलें नाहीं. तिला वाटलें, मुद्दाम तर करीत नसेल ना हा डायरेक्टर? कारण तिच्या पलीकडे बसलेल्या कथालेखकाच्या कानांत माणिकरावांनीं म्हटलेलें पुढील वाक्य तिला स्पष्ट ऐकूं आलें, "नशिबवान् आहे लेकाचा! मजा असते बुवा ह्या डायरेक्टरांची!"

पुन्हा सुरुवात झाली. पण ह्या वेळीं उषेच्या आवाजांत दोष निघाला. रेकॉर्डिस्टनीं बारिक आवाजांत डायरेक्टरांना सूचना दिली, "उषाताईंना जरा मोठ्यानें म्हणायला सांगा."

अखेरीला तास-दीड तास धडपड केल्यावर एकदाचा तो छोटासा सीन पार पडला. आणखी कांहीं किरकोळ प्रसंगांचें चित्रीकरण करण्यांत आल्यानंतर त्या दिवशींचें काम संपलें.

परत खोलींत येऊन उषेनें तोंड धुतलें. केस सारखे केले आणि पातळ बदलून खुर्चीवर अंग टाकीत तिनें कावेरीला विचारलें, " कसं काय वाटलं तुला ? "

" मी काय सांगणार ? पण तुझ्या त्या टकल्या डायरेक्टरनें तुझ्या जवळ यावं हें ......"

तिला गप करीत उषेनें म्हटलें, " हं. हळू बोल. नोकरी जाईल माझी. सिनेमा-जगांत कातडीच्या स्पर्शाला विटाळच नसतो."

तिनें पुन्हा एकदा आरशांत पाहून तोंडावरून रुमाल फिरविल्यासारखें केलें आणि छोटी कातडी हँड-बॅग हातांत घेत म्हटलें, " चल, आपण मेनहॉलमध्यें जाऊं. माणिकरावांची नि तुझी ओळख करून देतें नि नोकरीचंही सांगतें. "

दोघीही मेन हॉलमध्यें गेल्या. पंखा सुरू होता. डायरेक्टर मोहनचंद्र, कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर माणिकराव जोशी नि कथालेखक तेथेंच बसले होते. उषा खोलींत शिरतांच माणिकराव उठले. त्यांनीं तिच्याकडे पाहून ' मला मत द्या ' ह्या निवडणुकीला उभ्या असलेल्या म्युनिसिपल उमेद्वाराच्या लाचार मुद्रेनें हास्य केलें, आणि खुर्ची पुढें सरकवीत म्हटलें, " बसा, बसा ना. भारी दमलां असाल तुम्ही ? " आणि मोहनचंद्राकडे वळून म्हटलें, " भारी त्रास घेतात नाहीं उषादेवी ह्या चित्रपटासाठीं ? "

" वा, वा ! तें काय विचारावं ? मघाचा सीन तर इतका उत्कृष्ट झालाय, प्रेक्षक ' हाय, हाय ! ' करतील नुसते. "

" कांहीं हरकत नाहीं. पुढचा सीन असा टाकतों, " कथालेखक सांगू लागले, " कीं नायिका बंदिस्त स्नानगृहांत स्वैर स्नान करते आहे, नि नायक हळूच डोकावून... ! "

" पुरे हो तुमचं. आमच्या उषेसारखी नायिका नि ह्यांच्यासारखा दिग्दर्शक आहे, म्हणून लोक येतात तरी चित्रपटाला. विचारतो कोण स्टोरीला ? मी तर म्हणतों ज्यांत गोष्टच नाहीं असा चित्रपट काढावा. काय मोहनचंद्र ?... "

" तर...लेकाचे उगाच शेफारतात ! तुम्हीच लिहा माणिकराव असं एखादं बिन-कथेचें कथानक. " मोहनचंद्र म्हणाले.

उषेला हसूं आलें. कथा नसलेलें कथानक कसें लिहिणार हे? ती कांहीं तरी बोलणार होती. पण नोकरानें सरबताचे ग्लास आणून ठेवल्यामुळें त्या महत्त्वाच्या कामापुढें कथेसारखा क्षुद्र विषय मागें पडला.

डायरेक्टरसाहेबांनीं सगळ्यांच्या पुढें ग्लास केले. त्यांच्या बोटाचा स्पर्श न होईल अशा बेतानें कावेरीनें ग्लास उचलला.

सरबताचा पहिला घोट घेऊन माणिकरावांनीं डायरेक्टरांकडे पाहात म्हटलें, " फारच छान झालंय सरबत; अगदीं उषादेवींसारखं गोड ! "

उषा कांहींच बोलली नाहीं. सरबत संपविण्याचें तिचें काम चालूच होतें. माणिकरावांनीं कावेरीकडे निरखून पाहिलें आणि सरबत लागलेले ओठ चाटीत पुन्हा म्हटले, " ह्या कोण उषादेवी ? "

" हो, तेंच सांगायचंय. मुख्य काम तेंच होतं. "

" अस्सं ? सांगा ना. "

सरळपणें समोर पाहाण्याचा धीर कावेरीला होईना. ती उगीचच खालीं मान घालून पायांकडे पाहात बसली.

" तुमच्या सौभाग्यवती आजारी आहेत ना ? "

" हं ! " आंबट चेहेरा करीत माणिकराव म्हणाले, " गेलं दीड वर्ष ती अंथरुणाला खिळून आहे. अनेक उपाय केले. हं ! प्रभूची मर्जी ! "

" त्यांच्याकरितां एखादी बाई मिळाली तर हवी होती ना तुम्हांला ? "

" हो, हो ! त्या ह्या कीं काय ? "

" होय, गरजू आहेत ह्या. चांगल्या घराण्यांतल्या आहेत. परिस्थितीनें हे दिवस आणलेयत....... "

" असूं द्या ! प्रसंग काय, सर्वांवर येतात " नाटकी आवाजांत माणिकरावांनीं सहानुभूति दाखविण्याला सुरुवात केली. " माझंच पाहा ना ? आज एका बँकेचा, दोन गिरण्यांचा नि ह्या चित्रपटसंस्थेचा मॅनेजिंग डायरेक्टर असलेला माझ्यासारखा माणूस, एकेकाळीं मधुकरीच्या अन्नावर नि फाटक्या कपड्यांवर जगत होता हें खरं वाटेल कुणाला ? ह्यांनीं मनांत आणलं तर ह्यांनाही येतील चांगले दिवस. "

कावेरीला तो विषय नको होता. तिनें मध्येंच म्हटलें, " मग ? मी केव्हांपासून येऊं ? "

" हो, हो, वा! या ना! प्रथम तीस रुपये पगार देऊं शकेन तुम्हांला मी. माझ्या पत्नीशीं गप्पागोष्टी करायच्या, तिला हवं नको पाह्यचं, एवढंच तुमचं काम. मग, याल उद्यांपासून? नाहींतर असंच करा, आतांच चला माझ्या मोटारींतून. शुभस्य शीघ्रम्. काय?" आणि ते मोठ्यानें हसले.

एवढ्या मोठ्या गृहस्थाला नाहीं कसें म्हणायचें? आणि त्यांतून तिला गरज होती. तिनें उषेला हातांनीं खुणावीत विचारलें, "काय? चलायचं?"

उषेनें एक लांबलचक आळस दिला आणि इतरांना ऐकूं जाणार नाहीं इतक्या हलक्या आवाजांत ती म्हणाली, " आतां नाहीं गेलं तर? दमून गेल्येंय ग मी अगदीं!"

उषा दमून गेली होती ही गोष्ट अगदीं खरी होती आणि कावेरीला तरी कोठें इतका उत्साह होता? पण तिला वाटत होतें, 'आपण आतां येत नाहीं म्हणालों नि त्यांना राग आला किंवा उद्यां आपण जाईपर्यंत दुसरी एखादी बाई मिळाली तर ... आहे तीही नोकरी जायची. जावं हें बरं.'

तिनें आपलें मत हलकेच उषेला ऐकविलें. तिला तें पटलें असावें. तिनें माणिकरावांकडे पाहून म्हटलें, " चला, निघालों आम्ही."

सगळीं उठलीं. ड्रायव्हरनें दार उघडलें. मोटारींत मागच्या बाजूला उषा आणि कावेरी बसल्या. माणिकराव स्वतः मोटार चालवायला बसले. इतक्या सुखासीनपणें कावेरी प्रथमच मोटारींत बसत होती. माणिकराव स्टिअरिंगवर हात ठेवीत तेव्हां मुद्दाम आपल्या हातांतल्या आंगठ्यांची चाळवाचाळव करीत असावेत असा तिचा समज झाला. त्यांनीं कसला तरी उग्र सेंट लावला होता. वाऱ्याची झुळुक आली म्हणजे त्याचा भपकारा येई तो असह्य होई. तिच्या मनांत हजारदां आलें, " इथें कसं काय जमतंय कोण जाणें? आपण नीट राहावं मग काय होईल तें होईल. निदान उषेकडे तरी दिवस काढायला नकोत."

हे आणि असलेच विचार माणिकरावांचें घर येईपर्यंत तिच्या डोक्यांत घोळत होते. अखेरीस पी. वाय्. सी. कॉलनींतील एका दुमजली बंगल्यापुढें मोटार थांबली. माणिकराव स्वतः खालीं उतरले. त्यांनीं आपण होऊन

मोटारचें दार उघडलें आणि किंचित् मस्तक नम्र करून नाटकी आविर्भावांत म्हटलें,

" हं, उतरायचं म्हटलं ! "

दोघीही खालीं उतरल्या. माणिकरावांकडे नटी येतात हें पुष्कळांना माहीत असावेंसें दिसलें. दहा पांच मंडळी त्यांच्या आसपास जमा झाली. एकानें म्हटलें, " अरे, हीच ती मिस् उषा ! ' दिल्-की पुकार ' मध्यें काम केलंय ती ! "

दुसऱ्या एकानें साथ दिली, " अरे यार, काय माल आहे ! ह्या पठ्ठ्यानें दहा वेळां पाह्यलंय पिक्चर तें. पाणी आणीत असतांना ती पावसांत भिजते तेव्हां तर इतकी माशुक दिसते, कीं यंव ! "

तिसरा एक पोरसवदा तरुण पुढें आला आणि खिशांतली वही व पेन तिच्यापुढें करीत त्यानें तिला विनंती केली, " मिस उषादेवी, Autograph Please. "

उषा नुसती हसली. माणिकरावांनीं त्याला दरडावून म्हटलें, " चालते व्हा. हें काय थिएटर आहे ? "

तो मुकाट्यानें दूर गेला. दुसरा एकजण त्याला म्हणाला, " हॅट् लेका, उषादेवी नाहीं तर ती मागची; तिची घ्यायचीस. उषेपेक्षां तीच आहे चांगली. पण तुम्ही घाबरलांत माणिकरावांना ! "

" अं ! माणिकरावांची काय प्रतिष्ठा सांगतोस ? पत्नी घरीं आजारी असतांना नटींच्या पुढें गोंडे घोळणारा हलकट माणूस तो... "

बंगल्यांत शिरतां शिरतां कावेरीनें तीं वाक्यें ऐकलीं, पण ती काय बोलणार ? माणिकरावांच्या पाठोपाठ उषेबरोबर ती आंत गेली.

माणिकरावांच्या मुख्य दिवाणखान्यांत त्या गेल्या. केवढा भव्य आणि सुशोभित होता तो ! प्रत्येक उंची माल तेथें होता; पण रंग-संगतीपेक्षां भडकपणाच जास्त वाटत होता.

माणिकरावांनीं कपडे काढून ठेवीत म्हटलें, " बसा हं, आलोंच जाऊन मी. "

जुन्या पद्धतीची गादी, त्यावर तक्क्ये, लोड, तर एका बाजूला मऊ खुर्च्या, टेबलें, पुस्तकांनीं भरलेलीं कपाटें, अलमाऱ्या, जाळ्यांना लावलेले

जपानी चिटाचे पडदे...कावेरीला वाटलें ह्या घरांत काय करणार आपण ?

उषेनें कावेरीला हळू आवाजांत सूचना दिली, " ते तुला एकटीलाच आंत घेऊन जातील. मी त्यांच्या घरीं यावं हें त्यांच्या पत्नीला आवडत नाहीं. तेव्हां त्यांच्या पत्नीला तुझी नि माझी ओळख आहे असं सांगूं नकोस. तसं सांगितलंस तर तुझी नोकरी जाईल. माणिकरावांना मीं तसं सांगितलं आहे नि त्यांनीं तें कबूल केलं आहे. "

कावेरी कांहीं विचारणार होती, पण इतक्यांत कोणी तरी शीळ घालीत आंत आलें. जवळ जवळ अठ्ठावीस वर्षांचा तरुण होता तो. उंच पण कमालीचा कृश, गालफडें बसलेलीं, केस एकाद्या नटाप्रमाणें वळवून मानेपाशीं कापलेले, तोंड रंगलेलें आणि रात्रीं निजतांना वापरतात तशा तऱ्हेच्या चट्यापट्याच्या कापडाच्या विजारीवर तलम मलमलचा सदरा.

" ओ, उषादेवी ! what a fortune ? केवढा भाग्यवान् मी ! "

उषा फक्त हसली आणि कांहींतरी विचारायचें म्हणून तिनें विचारलें, " काय ? बरं आहे ना ? "

" आनंद आहे; पण आमच्या कामाचं काय झालं ? "

" कसलं काम ? "

" वा ! तुमच्या नव्या बोलपटांत आम्हांला काम देणार होतां ना ? आमचे वडील कांहीं दाद देत नाहींत. स्वत: ते तुमच्या कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत; त्याच धंद्यावर त्यांनीं बराच पैसाही कमावला आहे, पण आपल्या चिरंजिवांनीं सिनेमांत काम करावं हें कांहीं त्यांना पसंत नाहीं. मी खरं सांगूं ? तुम्ही कांहीं म्हणा, पण कलेचे शत्रू खरोखरी हे कुऱ्हाडीचे दांडे आहेत. तुम्ही... "

त्याचें व्याख्यान आणखीही लांबलें असतें, पण कोणीतरी त्याला खालून हांक मारली,

" बाळासाहेब ... "

बाळासाहेबांनीं संभाषण अर्धवट सोडलें, आणि आज्ञाधारक नोकरानें मालकाच्या हाकेला तत्परतेनें ओ द्यावी तसें त्यानें एकदम म्हटलें, " कोण ? बाप्पा ? आलों रे. "

आणि आला तसाच तो निघून गेला.

" कोण हे ? " अशा अर्थी कावेरीनें उषेकडे पाहिलें.

" हे ? नमुनेदार अविस्मरणीय व्यक्ति आहे एक ! हे माणिकरावांचे थो चिरंजीव बाळासाहेब. स्क्रीनहीरो व्हायचंय त्यांना. अवतार पाह्यल का कसा आहे तो ? वडलांच्या वशिल्यानें मॅट्रिकपर्यंत कशीबशी म मारलीय. शाळा सोडून आठ वर्षं झालींत. दोन वेळां जेवणं, सिनेमा, ना पाहाणं, नि इतर चैनींत वडलांचा पैसा उडवणं एवढाच उद्योग. माणिक फार चिडतात त्याच्यावर. पण काय करणार ? माझ्या मागें भुणभुण लावल स्वारींनीं, ' तुम्ही माणिकरावांना सांगून मला हिरो करवा ! "

" मग ? दे कीं त्याला एकदा चान्स ! "

" त्याला हीरो? अग असले चॉकोलेट हीरो लागतील तितके पडलेयत

कोणाचीं तरी पावलें वाजल्यासारखीं वाटलीं पण तीं माणिकरावां होतीं. ते आंत आले आणि त्यांनीं उषेकडे पाहून म्हटलें, " तुम्ही बसा मी घेऊन जातों ह्यांना आंत. " आणि कावेरीला म्हटलें, " चला. "

कावेरी उठली. कोण कोण आणखी प्रश्न विचारणार होते कोण जा दोन तीन दालनें ओलांडल्यावर मागच्या जिन्यानें दुसऱ्या मजल्यावर कोपऱ्यांतल्या एका खोलींत त्यांनीं तिला नेली.

खोली होती तीन खणीच. खिडक्या बंद असल्यामुळें खोलींत अंधा होता. पण त्या उघडल्या असत्या तर भरपूर उजेड आला असता. कोपऱ् एक कॉट असून त्यावर एक मध्यम वयाची स्त्री झोपली होती. एका बाजू एक छोटेंसें टेबल असून त्यावर अर्धवट सोललेलें मुसुंब पडलें होतें. क औषधें होतीं आणि त्यांचा विचित्र उग्र दर्प खोलींत कोंदटून राहिला हो

त्या स्त्रीला बहुतेक अर्धवट झोप लागलेली असावी. कारण माणिकराव चाहूल लागतांच तिनें मोठ्या कष्टानें हलके हलके एक एक शब्द उच्चा विचारलें, " कोण आहे ? "

बरेच दिवस आजारी असल्यामुळें जीविताला कंटाळलेल्या नि माणसासारखा तिचा स्वर येत होता. माणिकरावांनीं पुढें होऊन हलके सांगितलें, " कुणी नाहीं, मी आहें. ह्या नवीन बाई आल्या आहेत; तु हव्या होत्या ना ? "

त्या दुखणाईत स्त्रीनें कसाबसा उठण्याचा प्रयत्न केला, पण तिला उठवेना. अखेरीला तिच्या पाठीशीं हात देऊन कावेरीनें तिला बसती केली माणिकरावांनीं कोपऱ्यांतली खिडकी उघडून टाकल्यामुळें खोलींत पुरेसा प्रकाश आला होता आणि त्या प्रकाशांत ती बाई कावेरीला पूर्णपणें दिसत होती. तिची शरीरयष्टि इतकी बारीक आणि पांढरी फिकट होती, कीं ती बरेच दिवस कसल्या तरी असाध्य विकारानें आजारी असावी असा तर्क करणें चुकलें नसतें. गालफडें आंत जाऊन ओठांचा चंबू झाला होता. डोळ्यांभोवतीं मोठालीं काळसर वर्तुळें पडलीं होतीं आणि डोळे खोल गेल्यामुळें निस्तेज, भेसूर दिसत होते. बोलतांना तिला खूप परिश्रम होत असावेत. कारण ती साधीं वाक्यें बोले तींही थांबत थांबत. ”

पण माणिकरावांनीं तिला फार बोलण्याची तसदी दिली नाहीं. त्यांनीं सांगितल्यावरून कावेरीला इतकीच माहिती कळली, कीं ती दुखणाईत स्त्री माणिकरावांची पत्नी होती. तिचें नांव जानकीबाई. गेले सात आठ महिने ती आंथरुणाला खिळून होती. वैद्य, डॉक्टर चालूच होते. पण इतर पाहायला म्हणून कावेरीसारखी एखादी बाई हवी होती.

आजारीपणाचा फारसा अनुभव नसलेल्या कावेरीला तेथें उभें राहावेना. ह्या बाईची शुश्रूषा करायची ? त्यापेक्षां पळून जावें. नको ती नोकरी.

पण ती शब्द देऊन बसली होती. ती नाहीं म्हणाली असती तर उषेला खालीं मान घालावी लागली असती आणि नाहीं म्हणून तरी कावेरी काय करणार होती ?

तिनें ती नोकरी पत्करली – नव्हे दुसऱ्या दिवसापासून रुजू झाली.

तिला सकाळीं नवाला जावें लागे; मग जानकीबाईंचें औषधपाणी, हवें नको वगैरे होईपर्यंत बारा वाजत. पुन्हा दुपारीं चारला जावें लागे तें रात्रीं नऊपर्यंत. किरकोळ काम सोडलें तर कांहीं वाचून दाखव, गप्पा मार, असलीं कामें असतच.

आठ पंधरा दिवसांच्या परिचयानंतर कावेरीनें मनाशीं एक गोष्ट पक्की केली होती, आणि ती म्हणजे जानकीबाईंच्या कोणत्याही म्हणण्याला विरोध दर्शवायचा नाहीं. सर्वसाधारण आजारांत सुद्धा माणूस चिडखोर बनतो. जानकीबाई तर गेले सहा महिने आंथरुणावर होत्या. त्यांचा स्वभाव

कमालीचा चिडका झाला नसता तरच नवल. आणखी एका गोष्टीचें कावेरी मनाशीं आश्चर्य करी. जेव्हां जेव्हां माणिकरावांचा उल्लेख निघे तेव्हां तेव्हां ती असें कांहीं तोंड करी, कीं तिला जणूं म्हणायचें असे, ' पुरे झालं त्यांचं वर्णन ! नकोत त्या गोष्टी. '

आणि मग कावेरीलाही प्रश्न पडे, ' माणिकरावांवर चिडावं असं काय झालं असेल ह्या बाईच्या आयुष्यांत ? त्यांचं तिच्यावर प्रेम नसेल म्हणावं, तर किती उत्तम बडदास्त ठेवली होती त्यानीं तिची ? कोणत्याही प्रकारची उणीव नव्हती. एक मात्र खरं, ते फारसे तिच्या खोलींत जाऊन बसत नसत. पण अनेक व्याप मागें असलेल्या माणसाला तें कसं जमणार ? एवढी एक गोष्ट सोडली तर दुसरं कांहींच दिसत नव्हतं. मग ? एवढ्या साध्या गोष्टीवरून स्त्री नवऱ्यावर चिडेल ? असं काय घडलं होतं, कीं त्यामुळें जानकीबाईंना माणिकरावांचा तिटकारा वाटावा ?'

आणि तें गूढ काय असावें ह्याचा खुलासा नीट मनाशीं लागला नाहीं, म्हणजे ती स्वतःशीं म्हणे, ' असेल कांहींतरी ! काय करायचंय आपल्याला ? आपल्या आयुष्यांतलं गूढ कुणीं विचारलं तर आवडेल आपल्याला ? जोंपर्यंत आपल्याला व्यक्तिशः त्रास नाहीं तोंपर्यंत करायचंय काय आपल्याला ? '

पहिल्या महिन्याचा पगार हातांत पडल्यावर तिनें उषेला सांगितलें, " तूं केलंस तें पुष्कळ झालं. फार आभारी आहें तुझी मी. वास्तविक तुझी माझी लहानपणची ओळख. त्यांतून तूं किती श्रीमंत नि प्रसिद्ध. आपलेपणानें आधार देऊन मला मार्गाला लावलंस हेंच पुष्कळ झालं. मी आतां दुसरी निराळी जागा पाहातें. पुण्यांत मला फारसं कुणी ओळखत नाहींत हें बरंच आहे. कुठें तरी छोटीशी खोली घेऊन राहीन. "

उषेनेंही फारसे आढेवेढे घेतले नाहींत. मागें झालेल्या प्रसंगापासून कावेरी सुखरूप बाहेर गेली तर तिला तें हवेंच होतें. तिनें प्रत्यक्ष तसें बोलून दाखवलें नव्हतें कधीं. पण होत होतें तें ठीकच होतें. तिनें म्हटलें, " बरं आहे, नीट राहा. कांहीं लागलं तर माग. मी इथेंच आहे, पण कदाचित् हा चित्रपट सात आठ दिवसांत पुरा झाला म्हणजे मला लाहोरला जावं लागेल. तिथें एका उर्दू बोलपटांत मला काम करायचं आहे. बराच मोठा पगार मिळेल. नवीं माणसं, नवे प्रसंग, नवीन

अनुभव ... गंमत असते बघ ! पण जाईपर्यंत मात्र मी केव्हांही तुझी आहें."

सदाशिव पेठेंत एका जुनाट वाड्यांत कावेरीला एक लहानशी खोली मिळाली. होती दोन खणीच. रस्त्याच्या बाजूला खिडकी असल्यामुळें उजेड भरपूर येई. सडकेवरील रहदारी दिसे आणि मुख्य म्हणजे भाडें थोडें होतें. अवघें तीन रुपये !

माणिकरावांकडचे नोकरीचे तास सोडले तर ती घरींच असे. माणिकरावांच्या घरच्या नोकरीला ती अगदीं कंटाळून गेली होती. जानकीबाईंचा चिराचिरा स्वभाव, घरांतल्या लोकांची उर्मट वागणूक. तिला वाटे, "असेच का असतात सारे श्रीमंत ?"

माणिकराव बहुतेक वेळ बाहेरच असत. कोठें बँकेच्या सभा, कोठें कंपनीचें शूटिंग, कोठें इतर कामें. ते बाहेर नसले म्हणजे घरीं असत. पण तरीही नाना प्रकारच्या माणसांची ये जा चालू असे, आणि मग चहा, कॉफी, सोडा, ह्यांचा धुमधडाका सुरू होई. स्वयंपाकाला ठेवलेला ब्राह्मण कंटाळून जाई. नाहीं म्हणायला ते अर्धा एक तास खोलींत येत; पण जानकीबाईंशीं कधींच बोलत नसत. प्रकृतीची वगैरे चौकशी कावेरीजवळच करीत आणि कधीं कधीं म्हणत, "काय मजा आहे ! हिला पैसा आहे तर प्रकृति नाहीं, नि तुम्हांला ईश्वरानें दृष्ट लागेल असं सौंदर्य दिलंय तर सुख नाहीं. पण एक दिवस तुम्ही सुखी व्हाल. फार लांब खास नाहीं तो दिवस."

आणि चमत्कारिक नजरेनें तिच्याकडे पाहून ते हसत. ती गोंधळून जाई; पण...तिला कांहींच बोलतां येत नसे.

माणिकरावांना दोन अपत्यें होतीं. थोरले चिरंजीव बाळासाहेब आणि सात वर्षांची एकच मुलगी रत्ना. बाळासाहेब आणि रत्ना ह्यांच्यामध्यें त्यांना अपत्यें झालीं नव्हतीं असें नाहीं; पण कोणीच जगलें नाहीं. त्यामुळें दोन्हीं मुलें फार लाडांत वाढलीं होतीं. बाळासाहेब तर पुरा उनाड बनला होता. रत्नाच त्या मानानें चांगली होती.

माणिकरावांचें एवढें मोठें घर, पण एक प्रकारची उदास छाया पसरलेली असे नेहमीं. म्हणूनच नोकरीचे ठराविक तास संपवून आपण घरीं केव्हां येतों, असें तिला होऊन जाई.

घरांतला छोटासा सरंजाम; पण तो आपला आहे हें पाहून तिचें समाधान होई. देवावर तिचा दांडगा विश्वास होता. तुळशीबागेंतून श्रीरामाची एक तसबीर तिनें आणली होती, आणि मनाच्या श्लोकांचें पुस्तक तिच्या जवळ होतेंच. रोज आंग धुतल्यानंतर मनोभावानें ती त्या तसबिरीची पूजा करी, न चुकतां मनाचे श्लोक म्हणे.

ती ज्या वाड्यांत राहात होती, त्या वाड्यांतील सगळीं बिऱ्हाडें पांढरपेशा कारकुनांचींच होतीं. पहिल्यापासूनच तिनें मनाशीं ठरवलें होतें, कोणाकडे जायचें म्हणून नाहीं. पण तरीही वाड्यांत तिच्याबद्दल चर्चा होई. 'ही बाई विधवा म्हणावी तर कुंकू लावते, कुमारी समजावी तर गळ्यांत काळी पोत नि मणीमंगळसूत्र आहे. विवाहित असावी तर नवरा कधीं दिसत नाहीं. काय आहे तरी काय भानगड?' हा त्या वाड्यांतल्या बायकांनाच काय पण पुरुषांनाही प्रश्न पडे आणि नळावर अगर एरवीं गप्पा मारतांना त्यांच्यांत चर्चाही होई. कावेरीनें एक ठरवलें होतें, कीं लक्ष म्हणून द्यायचें नाहीं!

तरीही जगाच्या नीतिमत्तेची जोखीम आपल्या डोक्यावर घेऊन फिरणारे कांहीं उपद्व्यापी जीव असतातच. वाड्यांतल्या एका राधाबाईनें तिच्याकडे जाऊन तिला विचारलेंच, "काय बाई? बरं आहे तुमचं! मंगळसूत्र असलं म्हणजे झालं. कुणी बोलायला नको कांहीं नको, सगळा कारभार म्हटला तर गुपचूप नि म्हटला तर राजरोस!"

कावेरीनें तिला दंडाला धरून बाहेर खेचलें. पण मग सारा दिवस तिचें मन अस्वस्थ होतें. काय उत्तर देणार ह्या सज्जनांना ती? आणि तें ऐकून विश्वास तरी कोण ठेवणार? शेजाऱ्यांनीं तरी तसें कां विचारूं नये? अंधार नसला तरी धोका आहे असा संशय आल्यावर साप म्हणून दोरखंडावर तडाखे मारायला सुद्धां माणूस कमी करीत नाहीं. मग उघड उघड संशय घेण्यासारखी जेथें परिस्थिति, तेथें इतरांनीं काय म्हणून गप्प बसावें?

नाहीं म्हणायला वाड्यांतलें एकच बिऱ्हाड तिला आवडत असे आणि तें म्हणजे तिच्या खोली समोरच्याच बाजूला दुसऱ्या मजल्यावर एक विद्यार्थी राहात असे तें. ह्याचा अर्थ त्या विद्यार्थ्याकडे ती आकर्षिली गेली होती असा नव्हे; तर रिकाम्या चवकशा करण्याचा नसता उपद्व्याप तो तरूण

करीत नसे. त्याच्याकडे गप्पा मारायला, अभ्यासाला वगैरे बरेच तरूण विद्यार्थी येत; पण त्यांपैकीं कोणाकडूनही कावेरीला त्रास होत नसे आणि म्हणूनच त्यांच्याबद्दल तिला आदर वाटे.

पण एरवीं मागच्या सारखे कांहीं मनस्तापाचे प्रसंग आले म्हणजे कावेरी चिडे आणि तिला वाटे, 'ज्या एका गोष्टीमुळें आपल्यावर ही अनर्थपरंपरा ओढवली ती गोष्ट, म्हणजे आपलं लग्न, झालंच नसतं तर? तर किती सुखांत आपण राह्यलों असतों! सावत्र आई–माई. तिचा त्रास झाला असता फार तर. पण ह्यापुढें तो परवडला.'

आणि मग घरचें सारें बालपण तिला आठवे. पण तसें घरीं राहाण्यांत तरी आनंद कोठें होता? तसें असतें तर तिचें लग्न शक्य तितक्या लवकर जमावें म्हणून तिच्या वडिलांना एवढा आटापिटा करायचें काय कारण होतें? शाळेची हमाली संभाळून उरलेल्या वेळांत दुसऱ्या पत्नीची कटकट ऐकण्याची सक्तमजुरी सहन करून आपल्या लाडक्या कन्येसाठीं वरसंशोधन करणारे प्रेमळ आणि आनंदी भाऊ! स्वतःसाठीं त्या जीवाला किती यातना आणि कष्ट सहन करावे लागले होते हें तिला माहीत होतें.

श्रीमंती तर तिच्या घरांत नांवालाही नव्हती. आधीं शाळामास्तर आणि त्यांतही कोंकणांतल्या एका खेड्यांतला! दोन वेळां जेवण मिळालें म्हणजे मिळवलें. मास्तरांच्या वडिलांचें थोडेसें घरदार होतें म्हणे. पण तें सगळें सावकाराच्या घशांत गेलें होतें आणि त्यामुळें त्या गांवांत मास्तरांना स्वतःचें घर नव्हतें. त्यांचे एक दूरचे नातेवाईक मुंबईला असत. त्या नातेवाईकाचें घर त्याच खेड्यांत होतें.

मास्तरनीं घर, आगर स्वच्छ ठेवावा आणि मोफत राहावें ह्या अटीवर मास्तरना तें घर वापरायला मिळालें होतें. त्याशिवाय मास्तर गांवांतल्या पोष्टाचें काम पाहात. ते कांहीं पैसे मिळत, आणि इतर कोठें नारळ वीक, सुपारी वीक, असें करून वर्षाकाठीं कांहीं इतर प्राप्ति होई.

मास्तरांचें तरूण आयुष्य तसें बरें गेलें होतं. पण कावेरीचा जन्म झाला आणि मास्तरांची पहिली पत्नी गेली. वयाच्या अवघ्या पंचविसाव्या वर्षी मास्तर विधूर झाले. पुन्हा लग्न करण्याबद्दल नातेवाइकांनीं गळ घातली. तरूण मास्तरना तसें राहाणेंही शक्य नव्हतें. शिवाय "एखादा मुलगा नको

का ? " ही आशा होतीच. अखेरीला शेजारच्याच पंचक्रोशींतील एका गांवांतल्या भिक्षुकाची पांचवी कन्या द्वितीय पत्नी म्हणून घरांत आणून त्यांनीं पुन्हा संसाराला सुरुवात केली.

पण ... आपण कल्पना केल्याप्रमाणें आपला संसार सुखाचा होईल ही भाऊ मास्तरांची कल्पना पूर्णपणें फसली. माहेरीं अठराविश्वे दारिद्र्य असलेल्या त्यांच्या पत्नीला वाटे, आपल्या नवऱ्यानें आपली व आपल्या माहेरच्या माणसांची धन करावी. तीन मैल लांब असलेल्या तिच्या माहेरच्या गांवाहून एक दिवसा आड कोणी तरी येई. आणि मग भाऊंना अगर कावेरीला कळणार नाहीं अशा बेतानें ती एखादा जिन्नस माहेरीं नेण्यासाठीं म्हणून त्या व्यक्तीजवळ देई.

एकदा भाऊंनीं आपल्या कांहीं मित्रमंडळींना चहाला बोलावलें होतें. दोन दोन गरे देतां आले तर बरें ह्या उद्देशानें कोठूनसा चांगल्यापैकीं एक फणसही त्यांनीं पैदा केला होता. पण मित्र चहाला येण्यापूर्वीं पांचच मिनिटें त्यांना समजलें, 'काल आपण घरांत आणलेला फणस नाहींसा झाला.'

दुसरी पत्नी असूनही मास्तरनीं तिची भरपूर हजेरी घेतली.

वेळ निघून गेली खरी, पण फणस माहेरच्या माणसांना दिल्याबद्दलची चहाडी नवऱ्याजवळ कावेरीनेंच केली असावी अशी मात्र तिची खात्रीच झाली. आणि ह्या तिच्या समजुतीला शेजारणीनें पुष्टि दिली.

वास्तविक शेजारणीला ह्यांत पडण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण एक तर कोणाची टवाळी झाली तर ती हवीच असते आणि दुसरें म्हणजे कावेरीवर तिचा थोडासा राग होता. आदले दिवशीं तिनें कावेरीला पापड लाटायला बोलावलें होतें, पण तें न ऐकतां कावेरी उषेबरोबर खेळायला गेली होती.

कसेंही कां होईना ? कावेरी आपल्या चहाड्या नवऱ्याजवळ करते हा तिच्या सावत्र आईचा – म्हणजे माईचा – समज दृढ झाला खरा. आणि आधींच सुरू असलेली कावेरीची ग्रहदशा जोरांत सुरू झाली. जेमतेम दोन वेळ मिळणारें अन्न जेवावें आणि लहान सावत्र भावंडांना सांभाळून पडतील तीं आणि पडतील तितकीं कामें करावींत; त्याशिवाय भाऊ शाळेंतून आले

म्हणजे त्यांना पाय धुवायला पाणी देणें, हवें नको पाहाणें, सारें तीच करी. नाहीं म्हणायला संध्याकाळीं लहान भावंडांना घेऊन ती समुद्राच्या पुळणीवर हिंडायला जाई तेवढाच काय तो विसावा.

दुःखी माणसाच्या मनाची अशी एक विचित्र ठेवण असते, कीं आपलें दुःख सहानुभूतीनें ऐकून घेणारें कोणी माणूस त्यांना मिळालें तर त्या हलाखीच्या स्थितींतही त्या व्यक्तीला बरें वाटतें. निदान तसें माणूस नसलें तर भरपूर एकान्तही त्याचें दुःख हलकें करूं शकतो. सागराच्या त्या विस्तीर्ण पुळणीवर तिला हवी तशी शांतता मिळे. लहान भावंडांना पुळणीवर खेळायला सोडून दिलें म्हणजे समुद्राच्या त्या अथांग पाण्याकडे ती तासचे तास पाहात राही. लांबच लांब पसरलेला तो अफाट दरिया पाहिला आणि फोफावून फुटणाऱ्या लाटांचें तें पार्श्वसंगीत ऐकलें म्हणजे तिला वाटे, 'केवढें भव्य जीवन हें सागराचें! नि त्याला खंडही कधींच नाहीं! आपलीं सुखदुःखं किती वेडीं नि क्षुद्र!'

पाण्याचें तें अफाट, गंभीर पण नादमधूर संगीत ऐकतांना ती देहभान हरपे. आणि मग तिची आवडती मैत्रीण उषा देशपांडे पाठीमागें येऊन उभी राहिली तरी तिला कळत नसे.

सागराच्या संगतीप्रमाणेंच उषेची संगतही तिला हवीशी वाटे. आपल्या लहान भावंडांना घेऊन उषाही तेथें येई आणि मग दोघी गप्पा मारीत बसत. कावेरीनें तिला आपलीं दुःखें सांगावीं आणि रडूं लागावें. उषेनें तिची समजूत करावी,

"कावेरी, अग आपली आई सावत्र आहे एवढी तरी जागा आहे तुला समाधानाला. पण माझं बध ना? सख्खी आई असून सुख नाहीं, नि छळते असंही नाहीं. पण दर वर्षी बाळंतपण, अप्पांचं विड्या फुकण्यांत जाणारं रिकामं आयुष्य, पैशाचा तुटवडा. त्रासून जाते बघ ती, नि मलाही कंटाळा आलाय. मी ठरवलंय, शामू मामा आला, कीं त्याच्या बरोबर मुंबईला जायचं तें यायचंच नाहीं परत इकडे."

आणि खरेंच ती पुढें मुंबईला गेली होती.

कावेरीला तशी कोठें आशेला जागा होती? आजोळचे फारसे कोणीच

नव्हते. एक मामा होता वाटतें लांबचा पण तो कोठें बेपत्ता होता. तिची सुटका ह्या हालांतून होणें फक्त लग्न झालें तरच शक्य होतें.

शालेय शिक्षणाला मराठी पांचवीनंतरच रामराम ठोकावा लागला होता. जास्त शिक्षणाची गांवांत सोय नव्हती आणि माई म्हणत, "पुरे झालं शिक्षण! घरकाम पाहा जरा!"

माईंच्या किरकोळ त्रासाला तिनें महत्त्व दिलें नसतें फारसें. सावत्र आई सावत्र मुलीचे किती हाल करते हें गांवांतल्या एका उदाहरणावरून तिला माहीत होतें. तिच्या घरीं धर्मकृत्य करायला येणाऱ्या एका भटजीची हकीगत होती ती. त्यानें दुसरें लग्न केलें होतें. पहिल्या पत्नीपासून त्याला एक मुलगी होती. पण त्याची दुसरी पत्नी इतकी खाष्ट होती, कीं तिनें आपल्या सावत्र मुलीला एक दिवस उपाशी ठेवून हाताला इतका जबरदस्त डाग दिला होता, कीं त्या दुखण्यानें ती जवळ जवळ महिनाभर आजारी होती.

कावेरी स्वतःचें समाधान करून घेई, 'माई आपले इतके हाल तरी करीत नाहींना? पुष्कळ आहे!'

पण तिची ही समजूत खोटी ठरावी असाच एक प्रसंग लवकरच घडला. भाऊ शाळेच्या कांहीं कामासाठीं तालुक्याच्या गांवीं गेले होते आणि दोन दिवस ते परत येणार नव्हते.

त्या दिवशीं कावेरी सकाळीं अमळ उशीरानेंच उठली. तिचें आंग जरासें दुखत होतें आणि डोकें चढलें होतें. तरीही उशिरां उठण्याबद्दल माईनीं तिची संभावना केलीच आणि बोलूनही दाखवलें, "काम करायला नको, म्हणून खोटं ढोंग करतेस तूं!"

ताप आल्यापेक्षां आपल्यावर असला खोटा आरोप माईनीं करावा ह्याचीच तिला चीड आली आणि तिनें म्हटलें, "काय झालं एखाद् दिवशीं उशिरां उठलं तर?"

झालें! माईंना आणखी काय हवें होतें? तिनें कावेरीला नाहीं नाहीं त्या शिव्या दिल्या, "वाईट पायगुणाची आहेस तूं! जन्मतांच आईला घालवलंस, मी घरांत आल्यापासून मला सुख नाहीं. लग्न होऊन उलथतही नाहींस एकदाची?"

सव्वाशें पौंड वजन भरेल अशा शरीरयष्टीच्या माईंना सुख मिळत नाहीं ह्यावर कसा विश्वास ठेवायचा कावेरीनें?

संकटें सुद्धा एकामागोमाग एक येतात. त्याच दिवशीं दुपारीं तिच्या एका सावत्र भावाच्या कानांतला डूल हरवला. "कावेरीनेंच लपवला कुठें तरी तो. तिला आमचं बरं पाहावत नाहीं! चोरटी, अवलक्षणी" वगैरे वगैरे... माईंनीं कावेरीविरुद्ध सारी आळी दणाणून सोडली.

कावेरीनें परोपरीनें सांगितलें, पण त्या बाईचें एकच, "माझ्या पोराचे डूल दे; नाहींतर चालती हो घराबाहेर."

ती बाई एवढ्यावरच थांबली नाहीं. शेजारच्या गांवीं राहाणाऱ्या एका मांत्रिकाला तिनें बोलावून आणलें. त्यानें देवासमोर नाना प्रयोग केले आणि सांगितलें, "डूल घरांतच आहेत."

पण कावेरीचें नशीब शिकंदर म्हणून तिच्यावरचा आळ गेला. बरीच शोधाशोध केल्यानंतर विहिरीजवळच्या द्रोणींत डूल सापडला. तरीही त्या बाईनें म्हटलेंच, "एवढा आरडा-ओरडा झाला तेव्हां दिले असतील झालं हळूच द्रोणींत टाकून."

माईंच्या हलकेपणामुळें त्यांच्याबद्दल तिचें मन कलुषित झालें तें मात्र कायमचेंच. तिला त्या दिवशीं उत्कटत्वानें वाटलें, 'आपलं लग्न झालं तर सुटूं तरी ह्यांतून.'

अखेरीला शाळा तपासणीला येणाऱ्या एका इन्स्पेक्टरच्या कृपेनें तो भाग्याचा दिवस उजाडला. कावेरीचें लग्न ठरल्याचें तिला प्रथम कळलें तेव्हां ती गांवांतल्या राममंदिराजवळ आपल्या मैत्रिणींशीं बोलत उभी होती. तिच्या भावानें धावत येऊन तिला सांगितलें, "ताई, ताई, लवकर चल घरीं."

"कां रे?" तिच्या एका मैत्रिणीनें विचारलें, "घाई कां इतकी तुझी?"

"मग? लग्न व्हायचंय आमच्या ताईचं. ते परवां इनामदार आले होते ते?"

"मग? त्यांच्याशीं कीं काय? काय ग कावेरी, छान आहे नाहीं! ६५ वर्षांचा, त्या 'शारदेंत' ल्या भुजंगनाथ श्रीमंतासारखा? तुला खेळवील बघ!"

" इश्श ! कांहीं सुमार तुला, काय बडबडतेस ? "

पण तिच्या भावानें लगेच खुलासा केला " ते नाहींत कांहीं. त्यांचा मोठा मुलगा, केशवराव म्हणतात त्यांना."

सर्व मैत्रिणींनीं एका सुरांत कोरस म्हटला " बाईऽऽऽ कावेरी, इनामदारीण होणार म्हणायचीस तूं ! आतां कशाला ओळखशील आम्हांला ? "

कावेरीला गुदगुल्या होत होत्या. 'खरंच, आपलं लग्न जमणार ? ' कोणी तरी इनामदार तिला आदले दिवशीं पाहून गेले होते. पण लगेच पसंति होईल असें तिच्या स्वप्नांतही नव्हतें.

तिच्या वडिलांबद्दल तिला केवढा अभिमान वाटे ! त्या रात्रीं अंथरुणावर पडल्यानंतर किती तरी वेळ ती जागी होती. 'आपले भावी पति कसे असतील' ह्याचेंच चित्र कितीतरी वेळ ती कल्पनेनें उभें करीत होती. 'ते सुरेख असतील काय ? इनामदार आहेत तेव्हां खूपसा पैसा असेल. बरं होईल. आपल्याला सुख तरी लागेल !'

तिची एक मैत्रीण एका मराठी शाळामास्तरला आणि दुसरी पोष्टमनला दिली होती. तशी तर नव्हती तिची स्थिति ! ह्या विचारानेंच तिला बरें वाटत होतें.

पण ... 'आपल्याला तसं वाटत होतं ही केवढी चूक होती' हें लग्नानंतर तिला कळून आलें होतें. एका गांवठी शाळा मास्तरचें आणि एका पोष्टमनचें गृहिणीपद स्वीकारणाऱ्या तिच्या गरीब मैत्रिणीच सुखी नव्हत्या काय ?

कांहीं माणसें दुर्दैवी असतात, त्यांतलीच ती एक होती काय ? असा तिनें कोणाचा अपराध केला होता, कीं ईश्वरानें जेथें तेथें तिच्या अपेक्षांचा भंग करावा ? नव्हे आणखी तिसरेंच नवें संकट पुढें उभें राहावें ?

स्त्रीला, विशेषत: विवाहित सधवा, असहाय स्त्रीला, स्वतंत्र जीवन जगतांच येऊं नये काय ? निसर्गानें तर तिची अडवणूक केलीच आहे; पण समाजानें काय कमी नाकेबंदी केली आहे ? आपल्या सासऱ्याच्या मर्जीनुरूप दिराच्या म्हणण्याला ती संमति देती तर अनीतीचा मार्ग चालूनही समाजांत प्रतिष्ठित स्त्री म्हणून तिला मान्यता मिळती, पण...

आज ... एक घर सोडून पळून आलेली कुलटा ह्यापेक्षां जग तिला काय अधिक किंमत देणार ?

आपल्या खोलींत एकटी बसल्यानंतर असले विचार प्रामुख्यानें तिच्या मनांत येत आणि तिला वाटे, "नको हें असलं जीवित जगणं ! घरीं वडलांना कळलं तर हाय खातील ते ! माईच्या हातांत अनायासं कोलित मिळेल, नि एक उनाड, बदचालीची, घर, नवरा सोडून पळून जाणारी स्त्री एवढीच माझी गांवकऱ्यांना आठवण राहील. 'ते पहा भाऊ मास्तर ! अरे, त्यांचीच ती मुलगी कावेरी ! नवऱ्याला सोडून पळाली ती' म्हणून सगळे आपल्या वडलांकडे बोट दाखवतील नि भाऊंना आपल्यामुळें जिवंतपणीं मरणाच्या यातना सोसाव्या लागतील. त्यापेक्षां आपण कांहींच लिहूं नये. कळेल तेव्हां कळेल !" आणि असला विचार करण्यापलीकडे काय करतां येणार होतें तिला ?

नोकरी सोडली तर एरव्हींचा वेळ ती घरीं बसूनच काढी. कोणाकडे जायला नको आणि कोणी कांहीं विचारायलाही नको. त्यापेक्षां घरीं बसावें हें उत्तम.

सडकेला लागून असलेल्या भिंतीला जी खिडकी होती तेथें बसलें म्हणजे सडकेवरची सगळी रहदारी दिसे. सडकेच्या बाजूला एक उपाहारगृह होतें. तेथली सगळी वर्दळ तिच्या दृष्टीला पडे.

शाळा–कॉलेजच्या तरुण विद्यार्थी–वर्गांत तें उपाहारगृह फार आवडतें होतें. गिऱ्हाइकांची सारखी वर्दळ तेथें चालू असेच पण त्याशिवाय कांहीं ठराविक व्यक्ति तेथें सारख्या पडून असत. ते सगळे तरुण असून सुशिक्षित असले तरी सभ्य असावेत असें मात्र म्हणतां आलें नसतें.

सारा दिवस कांहीं तरी अरबट–चरबट खावें आणि सिगारेट पाठीमागून सिगारेट फुंकीत जाणाऱ्या–येणाऱ्यांची टवाळी करावी. त्या घोळक्यांत माणिकरावांचे चिरंजीव बाळासाहेब असावेत असा तिला संशय आला.

एक दिवस रात्रीं घरीं आल्यावर ती खिडकींत उभी होती. तिला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें कोणीं तरी म्हटलें, "काय रे बाळ्या ? रोज पाहातोय मी. समोरच्या त्या खिडकींत उभी असते ती कोण ? नवीन पण मोठं गिरेंबाज काम दिसतंय बुवा !"

बाळासाहेबांनीं सिगारेटचा खूप मोठा धूर सोडला आणि दोस्ताच्या हातावर टाळी मारीत म्हटलं, " अं ! ती होय ? हातची आहे आपल्या ! "

" सगळ्याच लेका तुझ्या हातच्या ! तसं असतं तर असा गप्प बसला असतास होय ? "

आणि मग खूप मोठी हास्याची फेर झडली. कावेरीनें धाडकन खिडकी लावून घेतली आणि अंथरुणावर अंग टाकलें. " उद्यां कांहीं कमी जास्त झालं तर ...पाहूं, तशी वेळ आली तर माणिकरावांच्या कानांवर घालूं. आधींच कशाला ? कारण तसं कांहींच नसलं तर खोटा आरोप केल्याबद्दल नोकरी जायची."

मग तिला झोप लागली, आणि ती जागी झाली तेव्हां किती वाजले होते कोण जाणें. तिच्याच वाड्यांत समोरच्या खोलींत विद्यार्थी राहात असे तेथें कोणी तरी मोठमोठ्यानें बोलत होतें.

तिनें दार उघडून बाहेर पाहिलें. स्वच्छ चांदणें पडलें होतें. हवेंत एक प्रकारचा सुखद गारवा होता. शेजारच्या घड्याळांत एक ठोका पडला. समोरच्या खोलींतलें कोणी तरी म्हणालें,

" एक वाजला बरं का जगदीश. झोपावं आतां. खूप झाला वादविवाद"

"बस् ! कंटाळला ना जगदीश ? " दुसरा म्हणाला, " मी म्हटलं नाहीं ? अरे बाबा, आमचंच म्हणणं मान्य केलं पाहिजे तुला ! स्त्रीला पतीशिवाय तरणोपाय नाहीं."

" अगदीं खोटी समजूत आहे ही. " जगदीश कीं कोण तो उसळून म्हणाला, " पतीशिवाय तरणोपाय नाहीं; पत्नीनें पतीला वंद्य मानावं; नव्हे, तसं नसेल तर संसार चालणार नाहींत, हेंही मला मान्य आहे. पण तसं असायला पतीही तसाच नको का ? तो व्यसनी असेल, मूर्ख असेल, असाध्य रोगानें पछाडलेला असेल, वेडा असेल, तर काय म्हणून पत्नीनें सारा जन्म त्याच्या जवळ काढावा ? अशा पतीला लाथाडून स्वत्व राखण्यासाठीं घराबाहेर पडलेल्या सतीचं, मी तरी अभिनंदन करीन."

कावेरी कानांत प्राण आणून त्याचा एकेक शब्द ऐकत होती. तिनें जगदीश काळा कीं गोरा पाहिला नव्हता. पण त्याच्याबद्दल तिला आदर वाटूं लागला, आणि तिला वाटलें, "मोठ्यानें ओरडून सांगावं त्यांना, ' तुम्ही

म्हणतां तशी मी पळून आलें आहें. सगळ्यांनीं झिडकारलं तरी माझं कौतुक करणारे तुम्ही आहांत हें काय कमी आहे? ' पण...असं कुणी सांगतं का?"

पुन्हा संभाषण जोरांत सुरू झालें.

"हा जगदीश पटवर्धन," कोणी तरी म्हणालें, "मुंबईकर झाल्यापासून सुधारक झाला हं!"

"अरे कसले सुधारक?" दुसरा म्हणाला, "अनाथ स्त्रियांबद्दल ह्यांची सहानुभूति म्हणजे नकली! ताटांतून बाहेर टाकलेल्या उष्ट्या जिलबीच्या तुकड्याकडे भिकारी नाहीं का आशाळभूतपणें पाहात? तसंच. सहानुभूति सहानुभूति म्हणायचं; कार्यभाग साधला, कीं बिचाऱ्यांना दूर ढकलायचं! सांग, अडचणींतल्या स्त्रीशीं कुणीं लग्न केलंय? बाबारे. प्रत्येकाला अनाघ्रात पुष्प हवं असतं बरं!"

आणि मग सारे हसले. कावेरीला निवडुंगाच्या फडांत पडल्यानंतर आंगाला कांटे टोंचावेत, तसें होत होतें. "पानांतली टाकलेली उष्टी जिलबी नि आपण एकच. जिलबी? छे! वाळलेले शिळे भाकरीचे तुकडे."

जगदीश पटवर्धन कीं कोण तो पुन्हा मोठ्यानें म्हणाला, "हें पाहा दोस्त, मी ज्या स्त्रियांबद्दल म्हणतों त्या म्हणजे विवाहित असून कुमारिकेचं आयुष्य कंठणाऱ्या. मी अगदीं खात्रीनें सांगतों, तशीच वेळ आली तर अशा अनाथ स्त्रीला मी अगदीं खात्रीनें जवळ करीन."

"तूंच कशाला? तशी वेळ आली तर मी सुद्धा तिला ' जवळ ' करीन." कोणीतरी म्हटलें.

"ए, काय हें अश्लील!" तिसरा ओरडला, "हें पाहा दोस्त, जगदीश खूप असं कांहीं तरी करील. पण त्याचा बाप हुंडा बुडवूं देईल का? श्रीमंत बापाचा, बी. ए. झालेला, एलएल्. बी. ला बसणारा हा देखणा दिवा! वडील काय फुकट घालवतील?"

पुन्हा हशा आणि टाळ्या. खोलीचें दार उघडलें आणि जगदीश कीं कोण तो बाहेर आला. स्वच्छ चांदण्यांत तो कावेरीला स्पष्ट दिसत होता. अर्धी विजार आणि अंडरवेअर एवढाच त्याचा पोशाख होता. पण त्याचे पिळदार दंड, पुष्ट पोटऱ्या आणि रेखीव हसरी मुद्रा. कावेरी किती तरी वेळ पाहात होती!

त्यानें कावेरीला पाहिलें कीं काय कोण जाणें? पण तोही तसाच उभा

होता. कोणीतरी आंतून ओरडलें, "काय करतोयस रे जगदीश बाहेर ! कुणी भेटलं कीं काय?"

जगदीश आंत गेला. त्यानें कोणाला कांहीं विचारलें कीं काय कोण जाणें ! पण कोणी तरी मोठ्यानें सांगत होतें,

"होय. तूं म्हणतोस तशीच असावी ती. अगदीं गरीब दिसते आहे. एकटीच असावी बहुतेक. निदान इथें ती आल्यापासून कुणी तिच्याकडे आल्याचं मी पाह्यलं नाहीं. सदा उदास असते. बघ तुझ्या सनाथ-अनाथ बाईच्या मालिकेंत बसली तर !"

"म्हणजे ? जगदीश इथें राहून करणार तरी काय? लॉ च्या टर्म्स, समाज सुधारणा, कीं कॉंग्रेसचं राजकारण ?"

कावेरीला चमत्कारिक वाटूं लागलें. दार बंद करून ती अंथरुणावर आडवी झाली खरी; पण जगदीश तिच्या डोळ्यांपुढून हालत नव्हता.

आणि दुसऱ्या दिवसापासून जगदीशच्या हालचालीवर नजर ठेवण्यांत न कळत तिचें मन रमूं लागलें. पण जगदीश फारसा दिसत नसे. कधीं येई, कधीं नाहीं. कधीं तर दोन दोन चार चार दिवसा दृष्टीस पडत नसे.

माणिकरावांकडची तिची नोकरी चालूच होती. जानकीबाईंची प्रकृति बरीच खालावत चालली होती. डॉक्टरांच्या सल्ल्यानें तिला पांचगणीला नेऊन ठेवलें असतें तर बरें होतें, आणि माणिकरावांचा तसा बेतहि होता.

कावेरी स्वतः होऊन एक अक्षरही बोलत नसे. नोकरी करावी, घरीं यावें, समोरच्या खोलींत चालणारे वादविवाद ऐकावेत; नाहींतर देवदर्शनाला जावें, एखादें धार्मिक पुस्तक वाचावें, हा तिचा ठरीव क्रम असे.

सासरची अगर माहेरची कांहींच हालचाल तिला कळली नव्हती. बाकी कळून तरी काय करायची होती म्हणा ? सहज म्हणून एकदा ती उषेकडे गेली होती. पण तिला कळलं, कीं उषा लाहोरला गेली होती आणि परत केव्हां येणार ह्याची खात्री नव्हती.

माणूस असेल त्यांत समाधानी राहाण्याचा प्रयत्न करीत असतो हेंच खरें. आहे असे दिवस गेले तरी निभावली असें वाटण्याइतकी तिची मनःस्थिति नाजूक आणि हळुवार झाली होती.

पण ... दरिद्री माणसाकडे कारणपरत्वें गेलेला, श्रीमान् पाहुणा जसा फार काल त्याच्याकडे राहात नाहीं, तसें दुर्दैवी व्यक्तींच्या आयुष्यांत सुखही फार वेळ रमूं शकत नाहीं.

एक दिवस नेहमींप्रमाणें ती माणिकरावांकडे गेली होती. त्या दिवशीं सकाळींच जानकीबाईच्या प्रकृतीनें उचल खाल्ली होती. आदले दिवशीं गार वाऱ्यांत बसल्याचें निमित्त होऊन दुसरे दिवशीं खूप ताप भरण्यांत त्याचें पर्यवसान झालें होतें. माणिकरावांचे फॅमिली डॉक्टर हजर होतेच. त्यांनीं तात्पुरते उपाय केले. किंचित् बरें वाटलें.

पण दुपारीं चार वाजतां कावेरी पुन्हा परत आली तेव्हां ताप खालीं आल्याचें कांहींच चिन्ह दिसत नव्हतें. जानकीबाईच्या आंगाची आग आग होत होती आणि तापलेली लोखंडी कांब हातांत धरावी तसें त्यांचें शरीर लागत होतें. सारें मांस नाहींसें झाल्यामुळें शरीर-विज्ञान-शास्त्र शिकवायला शाळेंतून हाडांचा सापळा ठेवतात तशी ती दिसत होती.

माणिकरावांच्या सांगण्यावरून त्या रात्रीं कावेरी घरीं गेली नाहीं. इतक्या आजारी मालकिणीला सोडून ती जाणार तरी कशी ?

संध्याकाळचा स्वयंपाक आवरून ब्राह्मण मात्र घरीं गेला होता. कोठलीशी नवी फिल्म लागल्यामुळें बाळासाहेब तिकडे रवाना झाले होते. छोटी रत्ना केव्हांच झोपली होती. जरा जाऊन येतों म्हणून माणिकराव कोठें तरी बाहेर गेले होते.

त्या साऱ्या बंगल्यांत कावेरी एकटीच होती. खिडकींतून बंगल्यांतल्या बागेची मनोहर मांडणी, पलीकडे दिसणारें क्रीडांगण, लांबवर दिसणारी टेकडी ... ती सगळें पाहात होती. एवढ्या मोठ्या बंगल्याची, ह्या वैभवाची मालकीण, मृत्यूचा मार्ग चालत होती. ईश्वर करो आणि ती लवकर बरी होवो.

रात्रीं साडे अकराच्या सुमाराला माणिकराव परत आले. ते जेव्हां त्यांच्या पत्नीच्या खोलींत आले तेव्हां कावेरी तेथें बसलीच होती. माणिकरावांना पाहातांच ती चटकन उठून उभी राहिली.

माणिकरावांनीं लाडिक आवाजांत म्हटलें, “हें काय ? उठतायू कशाला. मी काय परका का आहे कुणी ?”

कावेरीला काय बोलावें हें कळेना. तिनें माणिकरावांकडे रोखून पाहिलें. त्यांची जीभ बोलतांना अडखळत होती. डोळे तारवटल्यासारखे दिसत होते.

जानकीबाईंनीं हाक मारल्यामुळें ते तिच्या जवळ गेले. तिनें काय सांगितलें कोण जाणें, पण लगेच कावेरीकडे वळून ते म्हणाले, "खालीं जाऊन स्वयंपाक घरांतून थोडें दूध आणतां ?"

कावेरी मुकाट्यानें स्वयंपाक घरांत गेली. स्वयंपाक घर मोठें प्रशस्त आणि अद्यावत सामानांनीं भरलेलें होतें. कावेरीला वाटलें, "सारं जागच्या जागीं आहे; पण ह्या वैभवाची मालकीण मात्र दुर्दैवानें बिछान्याला खिळली आहे."

तिनें स्टोव्ह पेटवून दूध ऊन करीत ठेवलें आणि स्वयंपाक घरांतून बागेंत जायला जो दरवाजा होता तो उघडला.

ती कोणती तरी वद्य पक्षांतली रात्र होती. आकाश तारकांनीं भरलें होतें. आसपासचे बंगले शांत झोपीं गेले होते. दूरवर कुत्रीं भुंकत होतीं.

कोणी तरी आंत येऊन तिला विचारलें,

"काय पाहाताय ?"

कोणी तरी कोण ? माणिकरावच होते ते.

धोतराचा सोगा सुटलेला, शर्टच्या गुंड्या बेपत्ता झालेल्या, केस पिंजारलेले. कावेरीला भीतीच वाटली. तिनें हलकेच सांगितलें,

"दूध ऊन होतंय म्हणून उभी आहे जरा."

"राहूं दे दूध. जरा तुझ्याशीं मला बोलाचंय; इकडे ये."

एकेरी उल्लेख केलेला पाहून ती चपापली. पदर घट्ट बांधून तिनें खांबाचा आधार घेतला आणि म्हटलें,

"काय ?"

"दुसरं काय ? कावेरी, माझा संसार तूं पाहातेच आहेस. माझी पत्नी तुला दिसतच आहे. तुला पाहिल्यापासून माझं मन तुझ्यावर जडलं आहे. तूं माझी..."

"हाय ! काय बोलतां हें ? तुमच्या मुलीसारखी मी ! मृत्यूची वाट पाहाणाऱ्या तुमच्या पत्नीला काय वाटेल ? विचार करा. मी..."

माणिकराव खदखदून हसले आणि म्हणाले, "खुळे पोरी, बायको

धडधाकट असतांना ज्यानें दोन पोरी घरांत आणल्या होत्या तो काय आजारी बायकोला भितो? माझ्या पत्नीच्या प्रकृतीसाठीं तुला मी नोकरी दिली तें केवळ ढोंग होतं. ती लवकर आटपली तर हवीच आहे मला. तूं आपण होऊन वळशील म्हणून मी गप्प होतों. पण तूं पडलीस सीता–सावित्रीचा अवतार! पाहूं या! आतां तूं नि मी... ”

तिला चंदूची आठवण झाली. जवळ जवळ येणाऱ्या माणिकरावांना ती चुकवीत होती. काय करावें तें तिला कळेना. अखेरीला निखारे उचलायचा चिमटा शेजारीं पडला होता. तो तिनें उचलला आणि इतक्या जोरानें मारला, कीं ‘अयाईऽऽगऽ’ असा एक दुःखोद्गार काढून माणिकराव खालीं बसले.

ती चटकन शेजारच्या मधाशीं उघडलेल्या दाराकडे गेली. बाहेर उडी मारून दाराला बाहेरून कडी लावली आणि ती जी बागेंतून धावत सुटली ती सडकेवर येईपर्यंत थांबली नाहीं. पळतां पळतां एका कुंडीला अडखळल्यामुळें तिच्या पायाला लागलें होतें. पदर फाटला होता पण त्याकडे तिचें लक्ष नव्हतें. न जाणों, माणिकराव मागें येतील ह्या भीतीनें जीव घेऊन ती घराच्या रस्त्यानें पळत होती.

अखेरीला लकडीपूल ओलांडून गांवांतल्या रस्त्याला लागल्यावर तिला हायसें वाटलें. कोपऱ्यावरचें इराणी हॉटेल उघडें होतें. तेथल्या घड्याळांत तिनें सहज नजर टाकली. साडेबारा होऊन गेले होते.

आपली नोकरी नाहींशी झाली तर उद्यां पोटाला काय खायचें हा विचारही तिला त्यावेळीं शिवला नाहीं. घर...घर गांठायचें आणि दाराला घट्ट कडी घालून पडायचें, एवढा एकच विचार तिच्या पुढें होता. शर्यतींत भाग घेणाऱ्या उमेदवाराच्या गतीनें ती चालली होती.

रस्त्याला काळोख त्या मानानें बराच होता. एखाद् दुसरी व्यक्ति सोडली तर सारा मार्ग शांत होता. एक प्रेमी जोडपें हसत खिदळत तिच्या जवळून गेलें, पण तिकडे लक्ष देण्यासारखी तिची मनःस्थिति नव्हती. ती झपाझप चालली होती.

रस्ता अगदीं शांत, निर्मनुष्य होता आणि तिला बरेंच अंतर चालायचें होतें. पाठीमागून दोघे तिघे बोलत येत असल्याचा आवाज तिला ऐकूं आला. तिला बरें वाटलें. तेवढाच आधार.

ती जरा संथ चालूं लागली. मागचे लोक जवळ आले. अवघे तिघेच जण होते. प्रत्येकाच्या हातांत जळती सिगारेट होती आणि प्रत्येकजण इतक्या मोठ्यानें बोलत होता, कीं दोघेजण बोलल्याचा भास व्हावा. तो आवाज ओळखीचा असावा अशी एक शंका तिला आली. पण 'असेल कुणी झालं!' म्हणून ती पुढें चालूं लागली.

तिघेही अगदीं तिच्यापासून हाताच्या अंतरावर आले.

एकानें सुरांत गायला सुरुवात केली.

"नवीन पाखरूं आलंय कोणीऽऽऽ कडेऽऽ!"

कावेरीनें सहज मागें पाहिलें.

"वाईऽऽ! वाईऽऽ! पाहातंय डौलानें..." दुसऱ्यानें साथ दिली.

"आऽऽर. कलिजा खाल्लाऽऽऽ ह्यानें रे माझाऽऽऽ" तिसरा गाऊं लागला.

"दाव त्याला इंगा तुझाऽऽ" पहिला पुन्हा म्हणाला.

कांहींच न बोलतां कावेरी पुढें चालत होती. मागचे वीर पद्यावरून गद्यावर आले होते.

"अरे बाळ्या, लेका हें तें हॉटेलसमोरचं पात्र!"

"अस्सं! चाललं असेल कुणाच्या तरी आयुष्याची चांदरात साजरी करून परत. काय इनामदार, आहे का तुमच्या गांवीं असं?"

"हे:! अहो आमचं गांवढं गांव! तिथें कुठून असली अस्सल बिर्याणी मिळायला?"

पुन्हा हशा!

एक आवाज कावेरीनें ओळखला. तो बाळासाहेबांचा – माणिकरावांच्या दिवट्या चिरंजीवांचा होता.

तरीही ती गुपचूप चालली होती.

मागच्या प्रेमवीरांच्या पुन्हा अंगींत आलें.

"हाय रे यार! पंचपक्वानांचं ताट दूर लोटून जायचं? बाळ्या, कोण येतोय लेका ह्या वेळेला? इनामदार व्हा पुढें."

"हो, हो तर. मी काय लेचापेचा पुणेरी नाहीं. पाहा हवं तर!"

आणि खरोखरीच ते सगळे तिच्या पुढें गेले आणि हातवारे करीत म्हणाले,

"What a charming girl, अहो! थांबा ना."

" लाज नाहीं वाटत तुम्हांला सडकेवर एकट्या दुकट्या स्त्रीशीं फाजीलपणा करायला ? व्हा दूर. " कावेरीनें शक्य तितकें ओरडून म्हटलें.

एकजण फिदी फिदी हसत म्हणाला, " अहो सडकेवर नको असलं तर आम्ही घरीं येऊं. "

कावेरी एकटी, असहाय, अनाथ स्त्री. रात्रीची वेळ, निर्मनुष्य रस्ता आणि तीन उनाड अब्रूहीन टोळ.

ती मटकन् खालीं बसली आणि आईऽऽग म्हणून तिनें एक किंकाळी फोडली.

आणि मग काय झालें तें कळण्यापूर्वींच तिची शुद्ध नाहींशी झाली. पण दोन मिनिटांनीं ती शुद्धीवर आली तेव्हां तिला काय दिसलें ?

दोघे वीर जमिनिवर लोळत पडले होते आणि एक पसार झाला होता. ' हें काय ? ' अशा आश्चर्यानें तिनें सभोवार पाहिलें. तिच्या शेजारीं कोणीतरी उभें होतें आणि तिला धीर देऊन विचारीत होतें, " उठा. फार लागलंय तुम्हांला ? "

तिनें निरखून त्या विचारणाऱ्याकडे पाहिलें आणि आश्चर्याची एक अर्धस्फुट किंकाळी तिच्या तोंडून बाहेर पडली, " कोण? जगदीश पटवर्धन ? तुम्ही...तुम्ही इथें कसे ? " आणि पुन्हा ती खालीं पडली.

जगदीशनें तिच्या कानाजवळ तोंड नेऊन म्हटलें, " होय मीच. उठा, घरीं यायचंय ना ? "

तिनें पाहिलें, जगदीश एकटाच नव्हता. आणखी दोघेजण होते आणि त्यांनीं इतर दोघांना धरून ठेवलें होतें.

धरून ठेवलेले दोघेही ओरडत होते, " आम्ही लागेल तें करूं, तुम्ही कोण मध्यें पडणार ? तिचं आमचं ठरलेलं होतं..."

जगदीशनें ओरडून म्हटलें, " चूप. लाज नाहीं वाटत, अपरात्रीं एखाद्या सभ्य स्त्रीवर हात टाकतांना ? "

" सभ्य ! वा रे सभ्य ! माणिकरावासारख्या हलकट माणसाच्या घरांतून रात्रीं बाराला बाहेर पडणारी स्त्री सभ्य ! वा..."

त्यांतल्या एकाला शर्टची कॉलर धरून जगदीशनें पुढें खेचलें. भीतीनें त्याचे पाय लटपटत होते. तरीही जगदीशनें त्याला तसाच कावेरीपुढें खेचला आणि म्हटलें,

“ बघ, नीट बघ कोण आहे तें ! ”

कावेरीनेंही त्याच्याकडे पाहिलें.

पण त्याच्या चेहेऱ्याकडे दृष्टी जातांच आपली दांतखीळ बसून वाचा नष्ट होणार कीं काय अशी भीति तिला वाटली.

त्यानें तिच्याजवळ तोंड नेऊन म्हटलें,

“ कोण ? वहिनी ! कावेरी वहिनी ! ”

ती दिङ्मूढ झाली. आपल्या पायांखालची जमीन सरकते आहे असें तिला वाटूं लागलें. अडखळत तिनें म्हटलें,

“ हाय ! काय पाहातें मी हें ? कोण ? चंदू भावजी ? चंदू भावजी ? पुन्हा तुम्ही...”

आणि घेरी येऊन एकाएकीं ती खालीं पडली.

---

# ३

तो १९४१ चा जुलै महिना होता. हवेंतला उकाडा म्हणण्यासारखा कमी झाला नसला तरी मे-जूनमध्यें होणारी अंगाची तगमग बरीच कमी झाली होती, आणि ‘ नको हा उन्हाळा ’ म्हणून म्हणणारे जीव, ‘ भारी बुवा ह्या पावसाचा त्रास ’ म्हणून तक्रार करूं लागले होते.

हवाही मोठी चमत्कारिक झाली होती. सकाळीं ऊन येई, पण मग दुपारीं जीं अभ्रें भरून येत तीं जवळ जवळ दिवस मावळेपर्यंत. धड ना भरपूर पाऊस, धड ना ऊन. असल्या विचित्र हवेंत आपल्या त्या छोट्याशा खोलींत अंथरुणावर पडून राहाण्याचा कावेरीला कंटाळा येई. अंथरुणावर पडून राहाण्याचा असें म्हणण्यापेक्षां अंथरुणावर पडून राहावें लागल्यामुळें जगदीश आणि त्याची मावशी ह्यांच्याकडून करून घ्याव्या लागणाऱ्या कामाचा.

कारण सडकेवरच्या त्या प्रसंगानें कावेरीला धक्का बसून ती खालीं पडली तेव्हां तिला इतका जबरदस्त मार बसला होता, कीं कांहीं दिवस

आंथरुणावर पडून राहाण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. जगदीशनें तिला एका ओळखीच्या डॉक्टरकडे नेली होती. त्यांनीं इतकेंच सांगितलें, " बाईच्या मेंदूवर बराच ताण पडला आहे. त्यांना विश्रांति घेऊं द्या कांहीं दिवस."

जगदीशची एक म्हातारी मावशी गांवांत राहात असे. तिला मूलबाळ कोणीच नव्हतें. कावेरीबद्दलची सारी हकीगत जगदीशनें तिला सांगितली तिनें आनंदानें कावेरीकडे पाहाण्याचें कबूल केलें. ती स्वतः येऊन रोज हवें नको पाहात असे. कावेरीबद्दल तिला फार वाटे. तिनें एकदा तसें बोलूनही दाखविलें, " पोरी, तुझ्यासारख्या चांगल्या मुलीवर आलेले हे भलभलते प्रसंग ऐकले म्हणजे मला सुद्धा वाटूं लागतं जगांत देव नसावा. "

कावेरी फक्त एवढेंच म्हणाली, " असं कसं म्हणतां मावशी ? ज्या जगांत मला माझी सावत्र आई, सासरे, चंदूभावजी, माणिकराव असलीं माणसं – माणसं कसलीं राक्षस – भेटले, त्याच जगांत तुम्ही नि जगदीश भेटलांत ना ? त्याच दिवशीं नेमकी जगदीशरावांना सिनेमाला जायची सुबुद्धि सुचून त्याच वेळेला त्याच रस्त्यानें परत यावंसं वाटावं हाही एक ईश्वराच्या चांगुलपणाचाच भाग नव्हे का ? "

मावशींना हें सांगतांनाच असें नव्हे, तर एरव्हीं सुद्धा आंथरुणावर पडल्या पडल्या ती मनाशीं आश्चर्य करी.

' माणिकरावांकडे त्या दिवशीं घडलेल्या प्रसंगांतून आपण बाहेर पडतों काय नि दुर्दैवानें डाव साधावा तसे चंदू, बाळासाहेब आपल्याला भेटतात काय ! सहज म्हणून सिनेमाला गेलेले जगदीश त्याच रस्त्यानें परत येतात काय नि आपण एका जिवावरच्या प्रसंगांतून निभावून निघतों काय ! सारेंच अतर्क्य ! तितकेंच चमत्कारिक '

त्या आजारांत असतांनाच तिला एक विचित्र बातमी वाचायला मिळाली. एक दिवस जगदीश डॉक्टरकडून तिचें औषध घेऊन आला होता. त्यानें येतांना कसलेंसें वृत्तपत्र आणलें होतें. कावेरीपुढें धरीत त्यानें म्हटलें, " वाचा. "

तिनें तें पत्र घेतलें. मोठ्या टाइपांत छापलें होतें, " माणिकराव जोश्यांच्या पत्नीचें शोचनीय निधन." नंतर तिचा फोटो होता आणि खालीं लिहिलें होतें, " आम्हांस कळविण्यास वाईट वाटतें, कीं येथील प्रसिद्ध व्यापारी नि ×××

चित्रसंस्थेचे चालक श्री. माणिकराव जोशी यांच्या प्रेमळ, मनमिळाऊ नि सुविद्य पत्नी सौ. जानकीबाई ह्यांस काल रात्रीं दीर्घ मुदतीच्या आजारानंतर देवाज्ञा झाली. मरणसमयीं त्यांचें वय अवघें बेचाळीस वर्षांचें होतें. माणिकरावांचें त्यांच्यावर निःसीम प्रेम असल्यामुळें त्यांच्या मृत्यूनें माणिकरावांचा मोठाच आधार तुटला आहे. आमच्या बातमीदाराजवळ ते इतकेंच म्हणाले, 'माझं सर्वस्व गेलं; कुणाकडे पाहून जगूं मी?'

"त्यांच्या मागें त्यांचे सुविद्य चिरंजीव बाळासाहेब व धाकटी कन्या कु. रत्ना एवढींच अपत्यें आहेत.

"माणिकरावांवर ओढवलेल्या या आपत्तींत आम्ही सहभागी आहोंत. ईश्वर सौ. जानकीबाईंच्या आत्म्यास सद्गति देवो." **संपादक.**

जानकीबाईबद्दल लिहिलेल्या मजकुराबाबत तिला कांहींच वाटलें नाहीं. किंबहुना जानकीबाईंचा स्वभाव कळावा अशा परिस्थितींनें ती त्यांच्याजळ आलीच नव्हती. तिला विशेष वाटलें ते माणिकरावांबाबत लिहिलेल्या मजकुराबद्दल. नटीशीं लाळ घोटण्यांत ज्याचा दिवस जातो, पत्नी हयात असतांना तिच्या देखत दोन पोरी घरांत आणल्या म्हणून फुशारकी मारण्यांत ज्याला धन्यता वाटते, पत्नीच्या असहाय स्थितींत, ती अत्यवस्थ असतांना शुश्रूषेला ठेवलेल्या बाईवर जो हात टाकतो, तो इतक्या स्तुतिला पात्र आहे काय? पण जगाला कशी कळणार ही हकीगत? जग फक्त त्याचें सार्वजनिक आयुष्यच पाहाणार. श्रीमंत आहे, एका बँकेचा आणि कांहीं व्यापारी संस्थांचा डायरेक्टर आहे, प्रथितयश होऊं पाहाणाऱ्या एका चित्रपट संस्थेचा मॅनेजिंग डायरेक्टर आहे, गाडी बंगला आहे; बस्! तो मोठा असलाच पाहिजे. श्रीमंत का कधीं गुन्हे करतात?

'मृत्यूनंतर आत्म्याला अस्तित्व असेल आणि जर जानकीबाईंच्या आत्म्यानें हा मजकूर पाह्यला असेल; तर काय वाटेल त्या आत्म्याला? बाकी आत्मा नसेल तरच बरं! उघड्या डोळ्यांनीं दिसणारे अन्याय मृत्यूनंतर तरी दिसायला नकोत.'

× × × × ×

कावेरीला जरासें बरें वाटूं लागलें होतें. अशक्तता अद्याप बरीच कायम होती. पण अशक्तता असली तरी बसून राहायला ती एखादी धनिक–

पत्नी थोडीच होती? पोटासाठीं कांहींतरी प्रामाणिक कष्ट करणें तिला भागच होतें.

माणिकरावांकडे जाणें शक्य नव्हतें आणि त्यांनीं बोलावलं असतं तरी जायची तिची इच्छा नव्हती. पण ती गेली नसती तरी माणिकरावांचा तिच्यावरील रोष कमी होणें शक्य होतें काय? न कळत तिनें एक जबरदस्त शत्रु निर्माण केला होता. चंदूही पुण्यांत होताच. दोन काळसर्प आसपास वावरत असतांना कोणाचा जीव सुरक्षित राहील? चंदू पुण्यांत होता. निदान कावेरी पुण्यांत आहे हें त्याला माहीत होतें. इतकेंच नव्हे तर कावेरीनें पुन्हा त्याचा अपमान केला होता. माफी मागायला लावली होती. परत तो घरीं गेला आणि आबासाहेबांना त्यानें सांगितलें तर? ते येऊन आपल्याला घेऊन जातील आणि तसें परत घरीं गेल्यावर...ज्यासाठीं आपण इतकीं संकटें, हालअपेष्टा सोसल्या ती अब्रू जाईलच पण आपल्याला कसें बागवण्यांत येईल? जो तो बोट दाखवून म्हणेल, 'ही आबासाहेब इनामदारांची सून. पळपुटी, घरबुडवी. आबासाहेब सज्जन म्हणून त्यांनीं तिला घरांत घेतली.'

चंदूच्या अस्तित्वाचा विचार तिला बेचैन करून सोडी. असा प्रसंग आलाच तर काय करायचें ह्यावर ती तासचे तास विचार करी. घराबाहेर जाणें तिनें जवळ जवळ टाकलेंच होतें.

पण एक दिवस जगदीशनें तिला सांगितलें,

"कावेरीबाई, तुम्ही घाबरूं नका. घरांत बसलांत तर तुमचीच चूक आहे असा लोक नसता संशय घेतील. कुणी कांहीं करीत नाहीं. चंदूचा बंदोबस्त पोलिसांतल्या माझ्या एका ओळखीच्या अंमलदाराला सांगून मी केला आहे. घरीं वडलांजवळ भांडून तो इथें आला आहे असं मला समजलं आहे. तेव्हां तीही भीति नाहीं. प्रत्यक्ष तुमचे पतीच आले तरच तुम्हांला काय करायचं हा प्रश्न येईल. इतरांच्यानें कांहीं होणार नाहीं."

त्याच्या शब्दानें तिला धीर आला होता नव्हे--एक प्रकारचा आदर आणि आपलेपणा निर्माण झाला होता.

तरूण मनाशीं खेळण्याचा चाळा तिनें आजपर्यंत केव्हांच केला नव्हता. तशी सवड आणि संधीच आली नव्हती तिला. शहरी वातावरणांत वाढलेल्या

मुलींच्या पाहाण्यांत अगर वाचण्यांत येणाऱ्या बोलपट वाङ्मयाचे कोणतेच संस्कार तिच्यावर झाले नव्हते. ठरीव मार्गानें मिळालेल्या तरुणाला आपलें म्हणायचें, हीच एक ठराविक शिकवण तिला मिळाली होती आणि योग्य पति मिळाला असता तर तसें प्रेम तिनें केलेंही असतें. पण... त्याबाबत तिला पूर्णपणें निराश व्हावें लागलें होतें.

बहुधा प्रत्येक मानवी जीवनांत तरुणपणीं वाट्यास येणारें गोड स्वप्न तिला दिसण्यापूर्वींच विलीन झालें होतें. ज्या सुखासाठीं सामान्यच काय पण विशेष अशा स्त्री-पुरुषांनीं आसुसावें तें सुख तिच्या बाबतींत हातांत येण्यापूर्वींच नाहींसें झालें होतें. केवढा धक्का होता तो! आणि नंतर आलेले अनुभव! छे; तिला वाटे, 'आपलं डोकं कसं फिरलं नाहीं?'

पुरुष म्हटला म्हणजे 'आस्तिक आस्तिक' म्हणून दूर व्हावें इतकी धास्ती बसली होती तिला. आणि अपमान, हाल, विश्वासघात, अन्नाचा प्रश्न, ह्यांनीं ती इतकी गांजून गेली होती, कीं इतर तारुण्यसुलभ विकारांकडे लक्ष द्यायला तिला फुरसतच मिळाली नव्हती. सुकुमार, नाजुक फुलांच्या पाकळ्या उन्हाच्या कडक झळींत कोळपून जाव्यात तशा तिच्या नाजूक भावना परिस्थितीच्या वणव्यांत होरपळून गेल्या होत्या.

पण होरपळलेली जमीन पाणी मिळतांच पुन्हा ओलावा धारण करते. जगदीशचा सहवास तिला तसाच मिळाला होता. तिनें आपण होऊन फारशा सलगीनें त्याच्याशीं कधीं भाषण केलें नव्हतें अगर त्यानेंही कधीं मर्यादेचें उल्लंघन करण्याचें धाडस केलें नव्हतें हें जरी खरें होतें, तरी कावेरीला हें मनाशीं कबूल करणें भाग होतें, कीं आजपर्यंत कोणत्याही परपुरुषाबद्दल वाटला नाहीं इतका आपलेपणा आपल्याला जगदीशबद्दल वाटतो खराच.

तसें तिला वाटणें चूक होतें काय?

नेहरू शर्ट घातलेला आणि हातांत कसलें तरी इंग्रजी पुस्तक घेऊन जगदीश तिच्याकडे येई, तेव्हां तिला किती बरें वाटे.

तिला इंग्रजी कांहींच येत नव्हतें. पण जगदीश वकिलीच्या परीक्षेला बसतो आहे आणि तो काँग्रेसचा एक कार्यकर्ता आहे एवढें तिला ठाऊक होतें.

एक दिवस तिनें त्याला म्हटलें, " मला तुमच्या सारखं इंग्रजी येत असतं तर किती बरं झालं असतं."

" खरंच ? कां ? "

" पोटाच्या मागें लागण्यापेक्षां तुमच्यासारखं कार्य केलं असतं. असलं जिणं......"

पुढें तिला बोलवेना. आपल्या असहाय परिस्थितीचा तिचा तिलाच विषाद् वाटत होता.

जगदीशनें हसत म्हटलें,

" इतकंच ना ? मी शिकवीन कीं ! त्यांत कांहीं कठीण नाहीं फारसं. "

जगदीश म्हणाला होता खरें तसें ! पण तें शक्य नव्हतें. जगदीशजवळ इंग्रजी शिकण्यांत वेळ घालवून तिचा नोकरीचा प्रश्न कसा सुटला असता ? सांठवलेले पैसे संपत आले होते आणि नोकरी पाहाणें प्राप्तच होतें.

एकदा तिच्या मनांत येई, जावं झालं वडिलांकडे. कदाचित वर्तमान-पत्रांतील बातमीवरून त्यांना कळलंही असेल. कदाचित् मामंजींनीं लिहिलं असेल; कदाचित् अद्याप ह्याबाबत ते अंधारांतही असतील. बाकी कशाला जायचं ? पैशांसाठीं त्यांनीं आपल्याला विकलं, असं चंदूभावजी म्हणाले तें खरं असेल ? ज्या भाऊंनीं आईच्या पश्चात् आपल्याला जिवापाड जपलं ते भाऊ असलं नीच कृत्य करतील ? का त्यांची दिशाभूल झाली ? इन्स्पेक्टर सुद्धा ज्या स्थळाची शिफारस करतात तें वाईट कसं असेल ? कोणत्या मास्तरच्या मनांत असं येईल ? भाऊंना कांहीं नाहीं, पण त्या इन्स्पेक्टरला मात्र आबासाहेब इनामदारांकडून भरपूर चंदी मिळाली असेल.

तापानें आधींच हळुवार आणि हलक झालेलें तिचें मन ह्या विचारांनीं जास्तच थकून जाई आणि त्यांत रिकामा वेळही भरपूर. बाहेरची पावसाळी हवा आणि खोलींतलें दरिद्री वातावरण तिला सारखें भेडसावी. सगळीकडून जणूं आवाज उठत, ' क्षुद्र ! पापी ! पतित ...... नवऱ्याला सोडलंस ! धिक्कार असो तुला ! '

आणि मग अंतःकरणाचा तो कोलाहल शांत करणें तिला जड जाई.

कोणाकडे जाऊन कामधंदा विचारण्याइतकी ताकद तिला नव्हती आणि

ओळखी तर कोठेंच नव्हत्या. स्वयंपाकाची बाई, दाई, असलीं कामें करायला आतां तिचें मन घेत नसे.

एक दिवस मावशी तिच्याकडे आल्या होत्या. तिनें त्यांना आपल्या मनांतले विचार सांगितले आणि म्हटलें, " काय करूं मावशी मी ? मनाचा गोंधळ उडतो. करमत नाहीं. वाटतं, कुठें तरी जावं नि करावा ह्या जीविताचा शेवट. "

" वेडी ! बोलूं नये असं भलतंच " असें म्हणून मावशीनें तिला धीर दिला आणि म्हटलें, " मी जगदीशला सांगतें. करील कांहींतरी सोय तो ! पण खरं सांगूं तुला, मनाला गुंतवायला ईश्वरसेवेसारखं दुसरं साधन नाहीं. तूं माझ्याबरोबर रामाच्या देवळांत पुराणाला येत जा. बरं वाटेल मनाला तेवढं. "

आणि खरोखरीच ती मावशीबरोबर पुराणाला जाऊं लागली. त्यांत फार दिवस आपलें चित्त रमेल असें तिला वाटेना.

जागेसाठीं मारामाऱ्या करून एकमेकींना चिमटे घेणाऱ्या त्या भाविक बायका पाहून तिला गंमत वाटे, तर आपल्या गलेलठ्ठ पोटाचा भार सावरीत, नाकांत तपकीर कोंबीत पुराणांतील राधाकृष्णांच्या अनुषंगानें येणारा कृष्णलीलांचा भाग विशेष उत्तानपणें रंगविणारे ते पुराणिकबुवा तिला कसेसेच वाटत. विशेष भाग सांगितला म्हणजे विशेष स्त्रियांकडे ते निरखून पाहातात आणि हसतात हेंही तिनें पाहिलें होतें.

एकदा कृष्ण-रुक्मिणीचा प्रेमभाग वर्णन करीत असतांना रागावलेल्या रुक्मिणीला कृष्णांनीं कशी वश केली हें सांगतांना त्यांनीं सांगितलें, " आणि बरं काय महाराजा ! रागावलेल्या रुक्मिणीला कृष्णदेवानें जवळ घेतली आणि.... "

श्रोतृगणांत एकच हशा पिकला आणि पुराणिकबुवांनीं कावेरीकडे एक अर्थपूर्ण दृष्टिक्षेप टाकला.

दुसऱ्या दिवसापासून कावेरीनें पुराणाला जाणें बंद केलें. नव्हे; तें बंद केलें तरी मावशींना संशय येऊं नये अशी एक गोष्ट घडली.

आणि ती म्हणजे तिला नोकरी मिळाली.

जगदीशनें ती नोकरी आणली होती आणि ती अशी होती, कीं नको म्हणायला तिला जागाच नव्हती.

कांहीं सुखवस्तु महिलांनीं स्त्रियांची उन्नति करण्याच्या उद्देशानें म्हणून 'महिला-मंडळ' ह्या नांवाची एक संस्था स्थापन केली होती. त्या मंडळांत पांढरपेशा आणि श्रीमंत समाजांतील स्त्रिया जमत, खेळत, गप्पा मारीत, व्याख्यानें होत, सम्मेलनें करीत. पण त्याशिवाय त्या मंडळानें एक औद्योगिक खातेंही चालविलें होतें. त्या खात्यामार्फत पापड, लोणचीं, मुरंबे, मिरच्या, तिखट, हळद्, मसाले असले घरगुती नित्योपयोगी जिन्नस तयार केले जात. ते विक्रीसाठीं ठेवले जाऊन त्यांतून येणाऱ्या पैशांतून ते जिन्नस तयार करणाऱ्या महिलांना योग्य तो मेहेनताना दिला जाई.

संस्थेच्या सभासद् गांवांतील बऱ्याच प्रतिष्ठित स्त्रिया होत्या. त्याशिवाय इतरत्र मोठमोठ्या ठिकाणांहूनही मालाला मागणी होती. त्यामुळें संस्थेचें तें खातें व्यवस्थित चाललें होतें.

कोंकणांत आणि त्यांतल्या त्यांत शिक्षणाऐवजीं घरकामांतच सारें बालपण गेल्यामुळें पापड, पापड्या, मसाले, लोणचीं असलीं कामें करण्यांत कावेरी पटाईत होती, हें जगदीशला माहीत होतें.

'कॉंग्रेसचा चालू युद्धांतील दृष्टिकोन' ह्या विषयावर व्याख्यान द्यायला जगदीश त्या संस्थेंत गेला होता. अशा अशा बाईची संस्थेला जरुरी आहे असें त्याला तेथें कळलें होतें. संस्थेच्या मुख्य व्यवस्थापिकेची गांठ घेऊन त्यानें कावेरीबद्दल रदबदली केली होती. व्यवस्थापिकेनें त्याला हसून म्हटलें, "अहो उद्यां घेऊन या कीं ? फार जरूरी आहे आम्हांला अशा बाईची. दरमहा चाळीस रुपये देऊं प्रथम."

आणि त्याप्रमाणें कावेरी कामावर रुजू झाली. दुपारीं अकरापासून पांचपर्यंत तिला कामावर देखरेख ठेवावी लागे. देखरेख सर्व स्त्रियांचीच आणि कामही आवडीचें. ती त्या वातावरणांत पूर्णपणें रमली.

पगारही एकटीला कांहीं कमी नव्हता. 'कुठला कोण जगदीश ! त्यानें आपल्यासाठीं इतकी मेहनत घ्यावी नि केलेल्या उपकाराचा एका शब्दानेंही उच्चार करूं नये' ह्याची तिला धन्यता वाटे.

खरोखरीच जगदीश कोण आणि कोठला ह्याबद्दल तिला तशी फारशी

माहिती नव्हती. कॉंग्रेसचें कार्य करणारा आणि वकिलीचा अभ्यास करणारा एक श्रीमंत, उमदा तरुण एवढीच तिला त्याची माहिती होती. त्याव्यतिरिक्त त्याच्या मावशीकडून तिला जी माहिती कळली होती ती म्हणजे त्याचे वडील मुंबईला नामांकित बॅरिस्टर आहेत, एवढीच.

कामावरून घरीं आलें आणि रात्रीं अंथरुणावर आडवें झालें म्हणजे जगदीशबद्दल निरनिराळे विचार तिच्या डोक्यांत येत. क्वचित् तिला वाटे, ' जगदीशसारखा जोडीदार आपल्याला असता तर ? '

असला विचार मनांत येणें बरें नव्हे हें तिला पटे आणि मग मनांतली ती आग शांत करण्यासाठीं ती मनाच्या श्लोकांचा आश्रय घेई.

तिचें काम व्यवस्थित चाललें होतें. चंदूही कोठें दिसला नव्हता. तो पुन्हा गांवीं गेला होता, का आणखी कोठें पुण्यांत भटकत होता, ह्याची तिला कांहींच माहिती नव्हती.

तिच्या खोलीच्या खिडकींतून तें हॉटेल दिसे. पूर्वीप्रमाणेंच तेथें सारे टोळभैरव जमत, सिगरेट्स ओढीत, गप्पा मारीत. पण बाळासाहेब आणि चंदू मात्र तेथें कधीं दिसले नव्हते. ती फारसें तिकडे लक्षच देत नसे.

जगदीशच्या खोलीवर कोणकोण मंडळी आहेत, जगदीश केव्हां येतो, केव्हां जातो ह्यावरच तिचें सारें लक्ष केंद्रीभूत झालेलें असे.

तो कधीं फारसा खोलीवर नसेच. काय दोन चार तास दुपारचा असला तर; एरवीं हातांत एखादें जाड पुस्तक, वही आणि पेन घेऊन सारा दिवस भटकत असे. रात्रीं कित्येक वेळेला दोन दोन वाजेपर्यंत त्याच्या खोलींत दिवा जळत असे. स्नेही म्हणे देखील, ' पुरे बुवा पटवर्धन ! कसला ग्रंथ लिहिणार आहेस एवढा ? '

असले शब्द कावेरीला किती सुख देत. जगदीशबद्दल तिचा आदर दुणावे. ' श्रीमंत, हुशार नि एकटे असूनही किती श्रम करतात ! नाहींतर चंदूभावजी नि बाळासाहेब ! भरपूर पैसा, साधन असूनही शिक्षण नाहीं, रीत नाहीं, कांहीं नाहीं ! '

रिकामा वेळ जगदीशबद्दल विचार करीत बसा–घालवायची सवयच लागली होती तिला.

सुटीच्या दिवशीं बरीचशी तरुण मंडळी त्याच्याकडे जमत. कावेरीला त्यांतलें फारसें कळत नसे. पण कोणीतरी हिंदुधर्म, संघटना, असले शब्द जोरानें उच्चारी आणि त्याच्या त्या प्रश्नाला जगदीशकडून योग्य उत्तर मिळालें म्हणजे विचारणारा गप्प होई.

एकदा तर फारच गंमत झाली. कॉंग्रेसची युद्धांतील भूमिका, सरकारशीं असहकार ह्या विषयांवर जगदीश बोलत होता. कोणातरी भाईला तें न आवडून तो म्हणाला, "चूक आहे पटवर्धन तुमचं. रशिया दोस्त राष्ट्रांकडून लढत आहे. आम्ही रशियाचे अनुयायी आहोंत. हें लोकयुद्ध आहे. सरकारला आपण मदत केली पाहिजे."

जगदीशनें काय उत्तर दिलें कोण जाणे. तो भाई डोक्याचे केस उपटून टाकीपर्यंत चिडला आणि उसळून म्हणाला, "हं ! भलतंच बोलूं नका पटवर्धन. तुम्हांला समजायचं नाहीं त्यांतलं गुपीत !"

त्यांतलें गुपीत काय होतें तें पटवर्धनांनाच काय, कोणालाच सांगतां आलें नसतें. कावेरीला तरी कोठून कळणार? पण जगदीशला शिव्या देणाऱ्या त्या तरुणांबद्दल आणि त्यांच्या त्या विवक्षित वागण्याबद्दल तिचें मत कांहीं फारसें चांगलें झालें नाहीं खास.

तिनें एक दिवस जगदीशाला म्हटलेंही, "कशाला जमा करतां हे लोक? त्यांना पटत नाहीं तुम्ही जीव तोडून सांगतां तें ! नि तुम्हांला उगीच त्रास !"

"छे ! छे ! त्रास कसला? असं चालायचंच. आपले विचार दुसऱ्याला पटवून द्यायचे म्हणजे जराशी घसाफोड केलीच पाहिजे. बाकी हे कांहीं आडमुठे लोक सोडले तर बहुतेक समंजस तरुण वर्ग कॉंग्रेसच्याच मागें आहे हें नक्की. ह्या ऑगस्ट ७ ला मुंबईला कॉंग्रेसची बैठक आहे. महात्मा गांधी, नेहरू, अझाद, पटेल जमणार आहेत सगळे. तिथें ठरेलच सारं."

"खरं? मग तुमच्याकडे येणारे हे लोक गांधी-नेहरूंपेक्षांही शाहाणे आहेत म्हणायचे !" कावेरी हसून म्हणाली.

"हे? हे कांहींच नाहींत कावेरीबाई ! ऐकतात तरी बिचारे. पण माझ्या ओळखीचे एक विद्वान् आहेत, धीरेन्द्र धडफळे म्हणून. कुठें तरी वृत्तपत्रांत कांहीं दिवस लिहीत असत. पण स्वतःच्या मतांबद्दल इतकी घमेंड आहे

त्यांना, कीं गांधी–सावरकरांपासून छोट्याशा पुढाऱ्यांपर्यंत सारे मूर्ख वाटतात त्याला ! नि चालतो अशा ऐटींत, कीं लोक ‘ गांवठी हिटलर ’ म्हणतात तेंही त्याच्या लक्षांत येत नाहीं. ”

“ वा ! पाहिलीच पाहिजे स्वारी एकदा ! केव्हां येतात तुमच्याकडे ? ”

“ माझ्याकडे ? माझं नांव स्वप्नांत ऐकलं तरी दचकून उठेल तो. त्याचीं मतं नि वागणूक कांहीं निराळीच. कुठेंसा स्त्रीसमितीवर कधीं मागें बौद्धिक वर्ग घेत असे म्हणे. पण श्रोतृगणाची बौद्धिक भूक शमविण्याऐवजीं स्वतःची बौद्धिक भूक भागवण्यासाठीं केला कीं स्वारीनें एका मुलीशीं लघळपणा सुरू. ती पोरगीही मोठी वस्ताद होती. जरा जवळ येतोय असं वाटल्याबरोबर असा चप्पलप्रयोग केलाय डोक्यावर ! बिचाऱ्याला वर्षभर तरी सलूनमधें जायला नको. ती मुलगी माझ्या चांगल्याच परिचयांतली होती. त्याची समजूत, मींच तिला तसं करायला सांगितलं. बाकी मी न सांगतांच झालं तें चांगलं झालं म्हणा. पण तेव्हांपासून त्या पठ्ठ्यानें माझं नांव टाकलं तें कायमचंच.”

असली कांहीं बातमी ऐकली, कीं जगदीशबद्दलचा तिचा जिव्हाळा वाढतच जाई आणि त्याच्याशीं चाळा करणारें मन मागें खेचणें तिला फार जड होई.

महिला मंडळांतलें तिचें काम छान चाललें होतें. मंडळाच्या व्यवस्थापिका श्रीमंत असूनही मोठ्या आनंदी आणि मनमिळाऊ होत्या. अनाथ स्त्रियांबद्दल त्यांना विशेष आपुलकी वाटे आणि कावेरीची कामांतली स्वच्छता, टापटीप, साधाच पण स्वच्छ पोशाख, मोजकें बोलणें ह्यांमुळें तर त्यांची तिच्यावर विशेषच मर्जी बसली होती.

महिला मंडळांत चालणाऱ्या साऱ्याच गोष्टी तिला नवीन होत्या श्रीमंतांच्या बायका संध्याकाळीं तेथें जमत, गप्पा मारीत, बॅडमिंटन खेळत काम संपल्यावर वाटलें तर कावेरी कधीं थांबे, कधीं घरीं जाई.

एक दिवस ती अशीच थांबली होती. पावसाळी हवा होती आणि एक दोन सरीही येऊन गेल्या. आकाश ढगाळलें होतें. पाऊस पुन्हा केव्हां कोसळेल ह्याचा नियम नव्हता. बॅडमिंटन खेळायला म्हणून आलेल्या दोघीजणी स्वस्थ बसून गप्पा मारीत होत्या. कावेरी बाजूला उभी होती.

त्या गप्पा मारणाऱ्यांपैकीं एक जण जराशी लठ्ठ होती ती घाम पुशीत म्हणाली, " माणिकराव जोश्यांची पत्नी गेल्याला तीन वार होऊन गेले नाहीं ? "

" बरं झालं ! सुटली बिचारी ! " दुसरी म्हणाली.

" तें खरं हो ! पण जगती तर हवी होती. एवढी श्रीमंती ...... " तिसरीनें आपली सहानुभूति व्यक्त केली.

" कशाला ? नवऱ्याचे चाळे पाहायला ? " पहिली.

" म्हणजे ? " सहानुभूति दाखविणाऱ्या ललनेचें कुतूहल जागृत झालें होतें.

" अय्या ? तुम्हांला नाहीं का ठाऊक ? " जणूं, 'इतक्या सगळ्यांना माहीत असलेली गोष्ट तुम्हांला ठाऊक नसावी ? आश्चर्य आहे ! ' अशा मुद्रेनें तिनें शेजारणीकडे पाहिलें आणि म्हटलें, "सांगा बाई तुम्हींच."

सुशीलाबाईंनीं आपली तनुलता (?) हालवीत एकदा मुरका मारला आणि आपल्याला ठाऊक आहे तें सांगण्यांत विशेष उपकार करतों आहोंत अशा थाटांत म्हटलें, "आम्हीं आपलं ऐकलंय हो ! खरं खोटं देव जाणे ! आपल्याला काय करायचंय ? पण......! माणिकराव म्हणे पत्नीला नीट वागवीत नसत. बाकी तेंही खरंच म्हणा ! सारा दिवस त्या सिनेमानटी उषादेवीबरोबर हिंडायचं नि घरांत भांडींवाली, मोलकरीण ह्यांच्याशीं लघळपणा करायचा ! "

" खरं ? "

" तर ? खोटं सांगून मला काय राज्य उपटायचंय ? मागं एका तरण्याताठ्या स्वयंपाकिणीला पंढरपूरचा रस्ता धरायला लावला होता त्यांनीं. "

" बाई ग ! मग ती ओरडत उठली नाहीं ? काय तरी माणसं मेलीं ! "

" अहो, खूप ओरडली ती ! पण ऐकलं पाहिजे ना कुणीं ? पैसेवाले हे. तिला लग्नाचं आमिष दाखवून गंमत केली नि मागाहून ह्यांनींच ओरडा केला, कीं ही बाहेरून शेण खाऊन आली असावी म्हणून. नि चार महिन्यांचा पगार बुडवून तिला हाकून दिली. बिचारीनें सरळ पंढरपूरला जाऊन नदींत उडी टाकली. "

" सुटली बिचारी ! देवाच्या दारीं मेली ! " आणि मग तिघीही मोठ्यानें हसल्या.

कावेरीला पुढें ऐकवेना. माणिकरावांचे ते उपद्व्याप खोटे असतील असें तिला वाटेना. ' आपण सुटलों ! ईश्वराची मेहेरबानीच म्हणायची ! '

त्या रात्रीं घरीं आल्यानंतर तिला धड झोपही आली नाहीं. कल्पना-सृष्टीनें निर्माण केलेला त्या दीन बाईचा चेहेरा पुनः पुन्हा तिच्यासमोर येऊन म्हणत होता, " बरं झालं सुटलीस तूं ! "

एकाएकीं संध्याकाळपासून येऊं येऊं करणारा पाऊस जोरांत सुरू झाला होता. पत्र्यावर पडणारे पाण्याचे टपोरे थेंब काड काड आवाज करीत होते. पागोळीच्या पडणाऱ्या पाण्याचा विचित्र आवाज मधूनच कडाडणाऱ्या विद्युल्लतेंत मिसळून गेला होता आणि हवेंत विचित्र गारठा निर्माण झाला होता. एकुलती एक गोधडी तिनें डोक्यावरून घेतली आणि मग तिला झोप लागली. पण मध्येंच पहाटे पहाटे तिला जें स्वप्न पडलें तें किती चमत्कारिक होतें !

लग्नाच्या बोहोल्यावर ती उभी होती. भटजी मंगलाष्टकें म्हणत होते... होतां होतां मंगलाष्टकें संपलीं. अंतरपाट दूर झाला. तिनें पतीच्या गळ्यांत माळ घातली. पण नवऱ्याचा तो अवतार पाहून ती एकाएकीं दचकली. एका हातानें भटजींना दूर ढकलून तिनें नवऱ्याला बाजूला केलें आणि ती पळत सुटली.

कोणीतरी ओरडून म्हटलें, " कुठें चाललीस ? "

" माझं जीवन जगायला. जिथें तुमच्यासारखीं माणसं नाहींत तिथें."

समोरचा रस्ता विस्तीर्ण आणि भव्य होता. तिनें भराभर पळायला सुरुवात केली. पण पळूनपळून किती पळणार ?

थोडें अंतर चालून गेली नाहीं तों कोणीतरी तिला अडवलें. तो चंद्रू होता. विकट हास्य करून त्यानें म्हटलें, " कुठें चाललीस ? विवाहित स्त्री आहेस तूं. तुला स्वतंत्र आयुष्य नाहीं. फीर मागें. नवरा वेडा, खुळा असला तरी मी आहें. भावाचं नांव नि माझं गांव. "

तिनें त्याला बळेंबळें दूर ढकललें. पण पुन्हा कोणीतरी आडवें आलें. ते मामंजी होते. ते ओरडले,

" कुठें चाललीस आगलाव्ये? इनामदार घराण्याला काळं फांसतेस पळून जाऊन ? फीर मागें ? ऐक चंदूचं."

ती तशीच पुढें चालली होती. नव्हे, तसा तिला भास होत होता. कारण खरोखरीच पुढें जाण्याचा ती प्रयत्न करीत असतांही जागोजाग रस्ते रोखून नाकेबंदी करण्यांत आली होती. तिला हालतांच येत नव्हतें. उषेकडे अतिप्रसंग करणारा सिनेमास्टार नयनकुमार, माणिकराव, त्यांचे चिरंजीव बाळासाहेब, चंदू सारे तिच्याकडे पाहून मिस्किलपणें हसत होते. साऱ्यांच्या हसण्याचा एकच अर्थ होता, " आमचें ऐक; वैभवाच्या शिखरावर बसवूं तुला."

तरीही ती पळण्याचा प्रयत्न करीत होती. एकाएकीं खूप मोठा जनसंमर्द तिच्यापुढं आला. कित्येक ओळखीचे स्त्री-पुरुष, मित्र-मैत्रिणी अग्रभागीं चमकत होते. ते सारे ओरडून म्हणत होते, " कुठें चाललीस पळपुटे ? नवऱ्याला सोडून जातेस ? सासरा, दीर ह्यांचं ऐकत नाहींस ? घरबुडवी ! हलकट ! कुलटा........."

मूर्च्छा येऊन ती खालीं पडली...पडतां पडतां कोणीतरी तिच्या कानाशीं कुजबुजलें, " कुमारिकेचं, नाहींतर विधवेचं जिणं बरं. पण ना कुमारी, ना विधवा, ना विवाहित, असलं जीवन नको अशा स्त्रियांना सगळीकडे प्रवेश बंद."

आपण जोरांत आपटून आपल्याला लागणार ह्या भयानें ती ओरडली असती; इतक्यांत कोणींतरी तिला अलगद झेलली. कसली तरी गोड सुख–संवेदना तिला झाली. त्या मोहक मूर्च्छेत तिनें डोळे किलकिले केले आणि हलकेच पाहिलें.

कोणीं झेलली होती तिला ? दुसरें कोण ? तो जगदीश होता. खादीच्या शर्टमधूनही त्याच्या रुंदट छातीची ऊब तिला विलक्षण उन्मादकारी वाटत होती.

कपाळावरील केस एका हातानें मागें करीत जगदीशेनें तिच्या कानाजवळ तोंड नेलें आणि हलक्या पण गोड आवाजांत म्हटलें, " भ्यायलीस ? वेडे ! असं भिऊन कसं चालेल ? बघ, वर बघ. सगळे पळून गेलेत..."

आणि तिनें वळून पाहिलें तर खरेंच कोणी नव्हतें. कावेबाज डोळ्यांचे

मामंजी नव्हते, छटेल, हलकट चंदू, बाळासाहेब, माणिकराव नव्हते; शिव्या देणाऱ्या सभ्य स्त्री-पुरुषांचा जमाव नव्हता. सगळे कोठल्या कोठें गडप झाले होते आणि त्या राजरस्त्यावर राहिलीं होतीं फक्त दोघें— जगदीश आणि कावेरी ! कावेरी आणि जगदीश ! !

सुखाचा तो क्षण असह्य होऊन तिनें त्याच्या छातींत शिरल्यासारखें केलें आणि म्हटलें,

" जगदीश... ! "

जगदीशनेंही तिला जवळ ओढली. तिच्या केसांवरून हात फिरवला आणि ओठांजवळ ओठ नेत म्हटलें,

" कावेरी ! माझी कावेरी ! बघ ना वर ! "

त्याच्या श्वासांतली उष्णता तिला जाणवत होती. त्यानें तिला आणखी जवळ घेतली आणि......

× × × ×

ह्याच क्षणाला कावेरी खडबडून जागी झाली. तिनें इकडे तिकडे दृष्टि टाकून पाहिलें. आपण स्वप्नांत कीं जागया हें तिला क्षणभर कळेना. खोलींत भरपूर अंधार होता. आसपास कोणी नव्हतें. चंदू नव्हता, बाळासाहेब नव्हता, मामंजी नव्हते, माणिकराव नव्हते आणि जगदीशही नव्हता. एकटी एकच होती ती. आणि तीही आपल्या खोलींत.

" स्वप्नच तर ! कसलं भलतंच स्वप्न ! असलं स्वप्न पडणं चांगलं का वाईट ? "

तिला कांहींच समजेना. वास्तविक स्वप्नांत घडलेल्या त्या घटनेंत तिचा काय दोष ? पण आपल्या हातून पाप घडलें असें तिला वाटलें खरें. ती घाबरली. किती वाजले होते कोण जाणें ? तिनें उशापासची खिडकी उघडली. बाहेर अंधार मी म्हणत होता; सृष्टीचें तांडव नृत्य अजून चालूच होतें. बराच वेळ पाऊस पडत असल्यामुळें सडकेवर पाणीच पाणी झालें होतें आणि खळखळून वाहाणाऱ्या त्या पाण्याचा आवाज इतर आवाजांत मिसळत होता.

आंथरुणावर परत आडवें होऊन झोपण्याचा प्रयत्न तिनें केला. पण झोप येईल असें वाटेना. शेजारच्या घड्याळांत पांचचे ठोके पडले ते तिनें

ऐकले आणि मग झोप घेण्याचा प्रयत्न न करितां आंथरूण गुंडाळून ठेवलें. छोटा एकुलता एक दिवा लावला आणि चूळ भरून टाकली, कोपऱ्यांतल्या भिंतीवर लावलेल्या तसबिरीला मनोभावानें नमस्कार केला नि मनाचे श्लोक वाचायला सुरुवात केली.

सकाळ झाली, पाऊस थांबला आणि जराशी उन्हाची तिरीपही पडली. सहज म्हणून तिचें लक्ष जगदीशच्या खोलीकडे गेलें.

त्याच्याबद्दल विलक्षण आपलेपणा वाटत असूनही तिला वाटत होतें, जगदीश आपल्या दृष्टीला पडूं नये. निदान आज तरी.

परमेश्वरानें तिचें गाऱ्हाणें ऐकलें. जगदीश खोलीवर नव्हता. त्याच्या दाराला कुलूप होतें.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यानंतर दोन दिवस गेले तरी जगदीश तिला भेटला नाहीं. खोलीवर आलाच नाहीं तर दिसणार कोठून?

जगदीश कोठें गेला होता?

आवडती वस्तु अगर व्यक्ति दृष्टिआड झाली म्हणजे ती दिसेपर्यंत अगर तिचा ठावठिकाणा कळेपर्यंत माणसाला चैन पडत नाहीं. कावेरीचें असेंच झालें. जगदीश कुठें गेले असतील?

अखेरीस एक दिवस तिनें मावशींची गांठ घेतली. मावशींना कांहींच माहिती नसावीशी दिसली. त्यांनींच उलट तिला विचारलें,

"म्हणजे? जगदीश खोलीवर आला नाहीं चार दिवसांत? मलाही भेटला नाहीं. कदाचित् घरीं मुंबईला गेला असेल. पण मला सांगितल्याशिवाय जायचा नाहीं. खात्री आहे माझी!"

त्यानंतर जगदीश तिला दिसलाच नाहीं. ता. ७ ऑगस्ट १९४२ ला मुंबईला महात्मा गांधींच्या मार्गदर्शनाखालीं कॉंग्रेसची बैठक होती. सारी माहिती महिला मंडळांत येणाऱ्या वृत्तपत्रांवरून तिला कळे.

कॉंग्रेसच्या भव्य मंडपाचीं वर्णनें, टोलेजंग व्यासपीठ, जमणारे बडे बडे लोक ह्यांचीं वर्णनें ती हौसेनें वाची. कॉंग्रेसला हजर राहिलेल्या मोठ्या लोकांत जगदीशचें नांव वाचून तिला केवढी धन्यता आणि गौरव वाटत होता! जणूं तिचें स्वतःचेंच नांव छापून आलें होतें. त्याच दिवशीं मावशींची मुद्दाम भेट घेऊन तिनें सांगितलें,

" मावशी, काळजी करूं नका. जगदीश मुंबईला काँग्रेसच्या अधिवेशनाला गेले असून सुखरूप आहेत."

पण मग मात्र उलट सुलट बातम्या येऊं लागल्या. ता. ९ ऑगस्टला महात्माजी आणि इतर वंदनीय पुढारी ह्यांना अटक झाली. जनसमुदाय खवळला. सरकारच्या ह्या अरेरावीचा सार्वत्रिक निषेध होऊं लागला. गांवोगांवीं हरताळ पडूं लागले. सभा होऊं लागल्या, झेंडावंदन होऊं लागलें आणि सरकारनेंही दडपशाहीला सुरुवात केली. जो तो मत व्यक्त करूं लागला, "काँग्रेसशीं वैर साधून सरकारनें काय मिळवलं कोण जाणे ?"

अधिवेशन संपलें तरी जगदीश परत आला नव्हता. गांवोगांव खवळलेली जनता सरकारशीं असहकार करण्यांत अहमहमिकेनें भाग घेत होती आणि मुंबई, पुणें, सोलापूर, खानदेश, वऱ्हाड, नागपूर, दिल्ली, लाहोर ह्या मोठ्या गांवांपासून तों महाडसारख्या साधारण गांवापर्यंत सगळीकडून दंगलीच्या बातम्या येत होत्या. आज काय मुंबईला लोकांनीं ट्रॅम बंद पाडल्या; उद्यां लोकल्स थांबवल्या; परवां कोठेंतरी टपाल-थैली लुटली; तर तेरवां कोणीतरी बॉम्बस्फोट झाल्यामुळें जखमी झाले.

कावेरीला त्या बातम्या वाचून काय वाटे कोण जाणे, पण ती स्वतःशींच काळजी करी, 'जगदीश कुठें असतील ?'

एक दिवस तिला दोन विलक्षण बातम्या वाचायला मिळाल्या. एक म्हणजे मुंबईला फोर्ट विभागांतल्या कोठल्याशा गल्लींत बॉम्बचा स्फोट होऊन कांहीं युरोपियन शिपाई ठार झाले होते आणि दुसरी म्हणजे जगदीश बेपत्ता झाला होता. मोठ्या अक्षरांत छापलें होतें,

**सुप्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते श्री. जगदीश पटवर्धन हे फरारी असून त्यांचा शोध लावून देणाराला सरकारनें रु. १००० चें बक्षीस जाहीर केलें आहे.**

कावेरीला तो दिवस कमालीच्या बेचैनींत गेला. राहून राहून ती देवाजवळ विनवण्या करीत होती, "जगदीशना कुठेंही ठेव, पण सुखांत ठेव !"

त्या दिवशीं ती कामावर गेली खरी पण तिचें कामांत लक्ष नव्हतें. ती लवकरच घरीं आली. दारांत तिच्या नांवचें एक पत्र पडलें होतें.

सासर सोडल्यापासून तिला कोणाचेंच पत्र आलें नव्हतें. मग हें कोणाचें होतें? कांहींशा भीतीनें आणि कांहींशा उत्सुकतेनें तिनें तें फोडलें.

प्रिय कावेरी,

कितीतरी दिवसांत तूं मला भेटली नाहींस. मीही लाहोरला असल्यामुळें तूं येऊन गेली असलीस तरी भेट होणें शक्य नव्हतें. कालच मी परत आलें. तुझी माणिकरावांकडची नोकरी सुटली म्हणे? त्यांची पत्नी वारल्यामुळें त्यांना तुला नोकरीवर ठेवणें शक्य नव्हतें असें ते मजजवळ म्हणत होते. तुझी फार वाट पाहातें आहें. उद्यां सकाळीं येशील काय? जरूर ये. तुला कांहीं सांगायचें आहे. विसरूं नकोस.

तुझी बालमैत्रीण

**उषा देशपांडे**

तें पत्र वाचल्यानंतर कावेरीला आठवण झाली, 'आपण खूप दिवसांत उषेला भेटलों नाहीं. खरंच! उद्यां गेलंच पाहिजे. काय सांगणाराय कोण जाणे?'

दुसऱ्या दिवशीं उषेकडे जायचें म्हणून ती लवकर उठली खरी, पण उठावें असें तिला वाटेना. एकाएकीं उत्साह नाहींसा झाल्यासारखी तिची स्थिति झाली होती. गेलें नाहीं तर उषा रागावेल ह्या भीतीनें तिनें नेसणें नीट केलें आणि दारांत पाऊल ठेवणार तोंच कोपऱ्यांत पाल चुकचुकली. तिला कांहीं तो अपशकुन जाणवल्यावांचून राहिला नाहीं. 'काय होतंय कोण जाणे? जावं तर खरं!' असल्याच विचारांत ती बाहेर पडली.

आणि खरोखरीच ती उषेकडे गेली तेव्हां उषा तिचीच वाट पाहात बसली होती. उषेनें तिला हात धरून आपल्याजवळ बसवलें आणि म्हटलें, "ये, बैस!"

फारा दिवसांनीं भेटलेल्या जिवलग मैत्रिणी एकमेकींशीं बोलतील, तितक्या जिव्हाळ्यानें त्या दोघी बोलत होत्या. माणिकरावांची हकिगत ऐकल्यावर उषेनें म्हटलें, "असं कांहीं होईल अशी कल्पना होतीच मला. पण नोकरी करायला तूं उत्सुक होतीस नि माझ्याकडे घडलेल्या त्या प्रसंगापासून तुला लवकर नोकरी मिळेल तर बरं असं मलाही वाटत होतं. बरं झालं!"

आणि मग एक मिनिट ती गप्प बसली. कावेरीनें विचारलें, " कां ? गप्पशी ? "

" कावेरी, मघाचपासून विचार करतें आहे तुला सांगावं कीं नाहीं ? "

" इश्श ! इतकं काय सांगणार आहेस ? "

" तसंच आहे. मन घट्ट करून ऐकशील ? "

" म्हणजे ? मला नाहीं समजलं ! "

" तेंच सांगतें; ऐक. परवां शाम्‌मामा भेटला होता. तो सांगत होता..."

" काय ? काय सांगत होता शाम्‌मामा ? " काय विचित्र ऐकायला मिळणार ह्या भीतीनें कावेरीनें विचारलें.

" तो आपल्या, म्हणजे तुझ्या–माझ्या गांवाकडे जाऊन आला होता. "

" बरं मग....... "

" तो सांगत होता. तुझे वडील... ! भाऊ मास्तर !... " एक एक शब्द उषा शांतपणें उच्चारीत होती.

" त्यांचं काय ? " कावेरी जवळ जवळ ओरडली.

" काय असायचं ? नारळ काढायला म्हणून मास्तर झाडावर चढले होते. माड निसरडा झाला होता. पाय घसरून पडले नि..."

" आई ऽऽऽ ग ऽ ! खरं ? " मागच्या बाकाचा आधार घेत कावेरीनें डोकें टेकलें.

" होय. दीड महिना झाला ह्या गोष्टीला. अवघ्या चार दिवसांच्या आजारानंतर मास्तर...."

" भाऊ गेले ! खरंच ? आई ऽऽऽ ग ऽ " म्हणून कावेरीनें मागें कोचावर अंग टाकलें.

ऐकतों आहोंत तें खरें कीं खोटें ह्याबाबत साशंक होऊन ती इकडे तिकडे पाहात होती. कोणींतरी डोक्यावर जड ओझें ठेवल्यासारखें तिला झालें होतें. तिचे वडील–तिचें खरें मायेचें माणूस निघून गेलें होतें. पुन्हा न दिसण्यासाठीं. लग्नानंतर सासरीं जातांना त्यांनीं जो पाठीवर हात ठेवला तोच अखेरचा. जे शब्द बोलले तेच शेवटले आणि त्यांचें पार्थिव शरीर दृष्टीला पडलें तेंही अखेरचेंच.

उषा थांब थांब म्हणत होती तरी ती उठली आणि रस्त्यावर आली. सकाळचें गार गार वारें सुटलें होतें. हवा आल्हाद्कारक होती. पण कशांतच तिचें मन रमत नव्हतें. आणि तें कसें रमणार ? तिचे भाऊ कोठें होते ? बाकी एका अर्थी बरेंच झालें नव्हतें का ? लेकीची विटंबना तरी दिसायला नको.

डोळ्यांच्या पाणावलेल्या कडा तिनें पदरानें पुसून काढल्या आणि ती मार्ग चालूं लागली.

भिकारदास मारुतिमंदिरापाशीं आल्यावर तिला आठवण झाली, आज शनिवार. देवाला जाऊन यावें.

देवळांत भाविकांची जाये सुरू होती. घंटेचा आवाज निनादत होता. तिचे पाय न कळत मंदिराकडे वळले. ओवरीवर कांहीं ठराविक मंडळी बसली होती. कावेरीनें देवाला नमस्कार केला, प्रदक्षिणा घातली, आंगारा लावला आणि ओवरीच्या कट्ट्यावर येऊन ती बसली.

बाजूला तीनचार बायका बसल्या होत्या. त्यांतली एकजण कापऱ्या आवाजांत गात होती,

**" कुणि तरी अर्ज द्या हो माझा !**
**मजवरी रुसला त्रैलोक्याचा भाग्यवंत राजा "**

म्हणणाऱ्या बाईच्या आवाजांत कंप असला तरी जिव्हाळा होता आणि ती त्या ओळी पुनः पुन्हा घोळवून म्हणत असल्यामुळें त्या गोड वाटत होत्या.

' खरंच ! त्रैलोक्याचा राजा आपल्यावर रुसला आहे काय ? लहानपणापासून सुख म्हणून म्हणतात तें आपल्याला मिळूं नये असाच का ईश्वरी संकेत आहे ? आईचं सुख नाहीं, लग्नाचं नाहीं, सासरचं नाहीं; बाहेर पडलं तरीही नाना तऱ्हेचीं संकटं. एकुलते एक काळजी वाहाणारे वडील गेले; कुठले कोण ? पण आपलेपणानें निर्हेतुक मदत करणारे जगदीशसारखे महात्मे दुरावले नि उरलों आपण एकट्यां, करंट्या, हीन, अभागी; ईश्वराजवळ जाऊन त्याला ओरडून विचारावं, "बोल, काय भयंकर पातक केलं होतं मीं म्हणून असल्या संकटांतून मला फिरवतो आहेस ? सांग, कांहीं दया, माया, ममता, लोभ, शिल्लक असेल तर दे उत्तर. काय मिळवलंस मला असलीं दुःखं देऊन ? सांग. "

ती घरीं कशी आली तें तिचें तिलाच ठाऊक काम धाम नाहींच झालें. महिला मंडळांत कामाला जाऊं नये असेंच तिला वाटत होतें. पण आदले दिवशीं तिनें कुणकुण ऐकली होती, ' कुणीतरी बडे पाव्हणे उद्ईक भेटीला यायचेत म्हणून. '

असे कोणी पाहुणे यायचे असले म्हणजे मंडळांतल्या प्रमुख स्त्रिया हजर राहातच, पण इतर नोकरवर्गाला हजर राहावेंच लागे.

त्यामुळें तिला जाणें भागच होतें. तरीही ती बरीच उशीरा म्हणजे जवळ जवळ चार पांच वाजतां गेली. संस्थेच्या मुख्य हॉलमध्यें पाहुणे भाषण करीत होते. हॉलमध्यें बरीचशी गर्दी असल्यामुळें ती बाहेरच उभी होती. पाहुणे कोण हें तिला दिसत नव्हतें. पण त्यांचें बोलणें स्पष्टपणें ऐकूं येत होतें.

ते सांगत होते,

" तुम्ही करीत असलेल्या कामाबद्दल मला–मलाच काय, साऱ्या महाराष्ट्राला–नव्हे अखिल हिंदुस्थानला अभिमान वाटेल. सीता, सावित्री द्रौपदी ह्या आदर्श स्त्रियांनींच भरतखंडाचं नांव उज्ज्वल केलं. तुम्ही तशाच व्हा. संस्थेची उन्नति पाहून माझं अंतःकरण आज प्रेमानें भरून येत आहे. अशा प्रकारच्या संस्थांची आपल्या समाजाला आज अत्यंत गरज आहे. नव्हे, अशा संस्था निघतील तितक्या हव्याच आहेत. अशा संस्था श्रीमान् स्त्रियांना व्यायाम, खेळ, करमणूक, ओळखी ह्या दृष्टीनें उपयुक्त होतीलच. पण संस्थेची जी औद्योगिक शाखा आहे, तिचा उपयोग समाजांतील एकाकी स्त्रियांना खचित होईल.

" संस्था चालवायची म्हणजे काय अडचणी असतात ह्याचा अनुभव अनेक प्रमुख संस्थांतून मी महत्त्वाच्या जागेवर काम करीत असल्यामुळें मला चांगला आहे. हरळीच्या मुळ्या लांबवर पसरून जशा दीर्घकाल जगतात तशा तुमच्या संस्थेच्या शाखा लांबवर पसरून संस्था दीर्घकाल टिको, चिरस्मरणीय होवो. माझी पत्नी हयात असती तर बरं झालं असतं. असो ! ईश्वराची इच्छा. त्या साध्वीच्या नांवानें मी आपल्या संस्थेला एक हजार एक रुपये देण्याचं आश्वासन देतों. "

टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. संस्थेच्या व्यवस्थापिका व्यासपीठावर

चढल्या. देणगी दिल्याबद्दल आणि आपला अमूल्य वेळ खर्च करून अध्यक्षपद भूषविल्याबद्दल त्यांनीं अध्यक्षांचे आभार मानले.

अध्यक्ष खालीं उतरले. सभा संपली. एकदोघींच्या घोळक्यानें बायका उभ्या होत्या. व्हरांड्यांत बागेकडे पाठ करून कावेरी कोणाशीं तरी बोलत होती. व्यवस्थापिका आणि अध्यक्ष जवळ येऊन उभे राहिल्याचेंही तिला कळलें नाहीं.

व्यवस्थापिका सांगत होत्या, " ह्या आमच्या औद्योगिक शाखेच्या मुख्य... "

कावेरीनें एकदम बोलणें थांबवलें आणि वर पाहिलें. व्यवस्थापिकेबरोबर कोण होते ? अध्यक्ष—सन्माननीय पाहुणे—माणिकराव जोशी.

कावेरी कांहींतरी बोलणार होती. पण तिच्या पायांतलें त्राण नाहींसें झालें आणि झोंक जाऊन ती मागें आडवी पडली.

सगळाच गोंधळ उडाला.

' अगदींच भित्री बाई ! ' म्हणून कोणीं उपहास केला. तर ' बावरली बिचारी ' म्हणून कोणीं सहानुभूति व्यक्त केली. कोणीं उपहासानें दांत काढले.

कावेरीला फारसें लागलें नसलें तरी फूट दीड फूट उंचीच्या व्हरांड्यांतून एकाएकीं आंगणांत पडल्यामुळें आंग बरेंच ठेचाळलें होतें. एक दोघी सहकारिणींच्या मदतीनें तिनें घर गांठलें.

किती विचित्र पण निष्ठुर योगायोग होता ! ज्या माणिकरावांच्या पाशवी इच्छेचा तिनें निषेध केला होता ते माणिकराव सन्माननीय अध्यक्ष म्हणून तिची विचारपूस करणार होते ! दैवदुर्विलास म्हणतात तो ह्यापेक्षां दुसरा कोणता ?

दुसऱ्या दिवशीं ती जागी झाली तरीही आदल्या दिवशींच्या आठवणी बुजल्या नव्हत्या. आंग ठणकत होतें आणि हवाही अशी मळभी, खराब पडली होती, कीं कांही करावें असा उत्साहच वाटत नव्हता.

कामावर जाण्याऐवजीं ती पडूनच होती, ती जवळ जवळ दुपारीं चार वाजेपर्यंत. हवा होती तशीच कुंद होती. उलट पाऊस सुरू झाला होता.

सकाळपासून पोटांत कांहींच नव्हतें. चूल पेटवून तिनें चहाचें आधण ठेवलें.

चहा प्यायला ती बसणार तोंच महिला मंडळांतली मोलकरीण तिच्या नांवाची चिठी घेऊन आली. काय होतें चिठींत? घाईघाईनें तिनें ती फोडली. फक्त चार ओळी होत्या,

" झाल्या दिवसांचा पगार पाठवला आहे. उद्यांपासून आपल्या नोकरीची मला गरज नाहीं. फक्त सदाचारसंपन्न नि सच्छील स्त्रियाच नोकरीला ठेवायच्या असा आमचा नियम आहे."

खालीं व्यवस्थापिकेची सही होती.

दैव पुरतेंच तिच्या पाठीमागें लागलें होतें. खरेंच! कोण होतें दुराचारी? वैर साधून माणिकरावांनीं डाव टाकला होता हें उघड होतें. पण त्याला काय इलाज? कावेरीचा शब्द खरा, कीं एक हजार एक रुपये देणगी देणाऱ्या माणिकरावांचीं वाक्यें मोलाचीं?

कांहीं का असेना! तिला पोटासाठीं पुन्हा फिरणें भाग होतें.

विचार! विचार!! विचार!!! मस्तक फुटून जायची वेळ आली होती विचार करून. करायचें तरी काय तिनें? लग्न झाल्यामुळें कुमारिका नाहीं; नवरा वेडा, खुळा असल्यामुळें विवाहसुख नाहीं आणि तो जिवंत असल्यामुळें पुनर्विवाहाची सोय नाहीं!

केवढा प्रश्न होता!

सायंकाळ होऊं लागली होती. पावसाची रिपरिप चालूच होती. वातावरण उदास वाटत होतें. सडकेवर माणसांची तुरळक रहदारी सुरू होती. घरांघरांतून दिवे लागले होते.

कावेरीनें देवाला निरांजन दाखवलें, उदबत्ती लावली आणि किंचित् मोठ्यानें म्हटलें,

" देवा, सोडीव ह्या त्रासांतून!"

तो दिवस आश्चर्यामागून आश्चर्ये घडायचाच होता कीं काय कोण जाणे. कोणीतरी मागाहून म्हटलें, " होय, त्रासांतून सोडवायलाच आलोंय मी! पाहा इकडे. कावेरी!"

तिनें डोळे उघडून पाहिलें.

देवापुढचें निरांजन आपोआप गरगरां फिरूं लागलें असतें तरी ती भांबावली नसती. पण ... चंदू—ज्याला तिनें दोनदां झिडकारलें होतें, तो बदफैली चंदू–तिचा दीर––दुर्दैवाच्या रूपानें दारांत उभा होता.

" कोण ? चंदूभावजी ? "

" होय मीच ! भ्यालीस कीं काय ? " आणि चंदू मोठ्यानें हसला.

कावेरी भ्रमिष्टासारखी पाहात होती.

" पाहातेस काय अशी ? चल घरीं. तुला न्यायला आलोंय मी. मजेंत राहूं दोघं ! चल, नाहीं म्हणूं नकोस ! तुझ्यासाठीं जीव टाकतोंय मी. "

तिनें ओरडून म्हटलें, " चंदूभावजी, काय बरळताय हें ? वडिलांची चाड ठेवा कांहीं; निदान देवाब्राह्मणांसमक्ष ज्यांचा हात धरला त्यांची तरी चाड ठेवा कांहीं. "

" कुणाची ? केशवची ? तेंच सांगायला आलोंय तुला मी ! तुझा मार्ग निष्कंटक झाला. केशवचा अवतार संपला. नीट ऐक ! आठ दिवसांपूर्वी घरावर दरोडा पडला. दरोडेखोरांनीं आबांना नि केशवला बेदम चोपलं. आबांनीं तडकाफडकीं प्राण सोडला. चार दिवसांच्या आजारानंतर केशव... "

कावेरी मटकन खालीं बसली. घराच्या भिंती फिरताहेत कीं काय असें तिला वाटत होतें. तिनें मोठ्यानें म्हटलें, " खोटं, खोटं सांगतां तुम्ही ! माझं कुंकूं बळकट आहे ! मी जगदीशना विचारीन. "

" जगदीशला ? कोण जगदीश ? हं ! हं ! तो उनाड ! घे, वाच हें ! एका बॉम्ब स्फोटाच्या खटल्यांत तो दोषी ठरून त्याला दहा वर्षं सक्तमजुरी मिळाली आहे. "

त्यानें टाकलेलें पत्र तिनें उचललें. मथळ्यांत छापलें होतें,

## दे. भ. पटवर्धन ह्यांना अटक व शिक्षा !

**गेले कांहीं महिने फरारी असलेले प्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते दे. भ. जगदीशराव पटवर्धन ह्यांना नुकतीच अटक करण्यांत आली होती. मुंबईला फोर्ट विभागांत झालेल्या एका बॉम्ब स्फोटांत**

त्यांचें अंग असावें असा सरकारला संशय होता. त्यांच्यावर भरण्यांत आलेल्या खटल्यांत कोर्टानें त्यांना दोषी ठरवून दहा वर्षें सक्तमजुरीची शिक्षा दिली आहे.

आणि लगेच खालीं बातमी होती,

### × × × येथें दरोडा

गेल्या आठवड्यांत गांवांतील प्रतिष्ठित व सधन नागरिक श्री. आबासाहेब इनामदार ह्यांच्या घरावर मध्यरात्रीं मोठाच दरोडा पडला. दरोडेखोर जमावानें असून बुरखा घेऊन आले होते. त्यांच्या हातांत कुऱ्हाडी, दगड आणि भाले होते. आबासाहेबांनीं खूप हरकत घेतली. पत्नी पळून गेल्यापासून अर्धवट वेडसर अवस्थेंत असलेले त्यांचे थोरले चिरंजीव केशवरावही मदतीला धावून आले. पण चोरट्यांनीं आबासाहेबांना इतका मार दिला, कीं थोड्या तासांच्या अंतरानें त्यांचें प्राणोत्क्रमण झालें आणि माराचा बराचसा प्रसाद मिळालेल्या केशवरावांना चार दिवसांच्या तापानंतर देवाज्ञा झाली.

झाल्या प्रकारानें ह्या पिता–पुत्रांचा असा अंत झालेला पाहून सारा गांव हळहळतो आहे. दुःखांत सुख एवढेंच, कै. इनामदारांचे धाकटे चिरंजीव चंद्रकांत येथें नाहींत. निदान त्यांचा तरी जीव बचावला.

आणि पलीकडे माणिकरावांचा फोटो होता. महिला मंडळाला कैलासवासी पत्नीच्या नांवानें देणगी दिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें होतें.

कावेरीनें चोळामोळा करून तें पत्र चंदूच्या अंगावर फेकलें आणि ती ओरडली,

“ माझं मी पाहून घेईन. तुम्ही जा, चालते व्हा. जगदीश सुटून येईल ! ...”

“ जगदीश सुटण्याचं नांवच सोड. त्या दिवशीं रस्त्यांत त्यानें नि तूं

माझा अपमान केला नसतात, तर सुरक्षितही राहाता तो! अपमान करतांना कांहीं वाटलं तुम्हांला ?"

हाय! एकूण जगदीशचा ठावठिकाणा सांगण्यांत चंदूचें आंग होतें तर?

शेजारचा तांब्या तिनें उचलला आणि चंदूवर उगारीत म्हटलें, "चालता हो, नाहींतर हें घे बक्षीस!"

होता नव्हता तितका जोर करून तिनें तो तांब्या चंदूवर भिरकावला. पण चंदू होता कोठें तेथें? तो केव्हांच पसार झाला होता. एकुलता एक तांब्या आपटून त्याला मात्र ठिकठिकाणीं पोचे आले होते.

कोणत्या भयाण परिस्थितींत कावेरी उभी होती! बाप मेला, सासरा गेला, नोकरी गेली, ज्याच्या जिवावर उड्या मारायच्या तो नवरा गेला. सहानुभूति दाखविणारा जगदीश, तोही दीर्घकाल दूर जाणार होता.

राहिली एकटी–अगदीं एकटी–आणि अभागी कावेरी!

भोवळ आल्यामुळें तिनें भिंतीवर डोकें टेकलें. तिच्या आसपास तिचा सासरा, नवरा, माणिकराव, चंदू सारे गोळा झाल्यासारखे तिला वाटत होतें. ते सारे ओरडून म्हणत होते,

"कां रडतेस आतां? तुला ठाऊक नाहीं, विवाहित स्त्रीला कुठें मार्ग नाहीं तें? सगळीं नाकीं बंद आहेत. तिला एकच मार्ग, एकच ध्येय, एकच ध्यास! पति! पति!! पति!!!"

"खरंच! चुकलें का मी?" म्हणून म्हणत असहायतेनें तिनें इकडे तिकडे पाहिलें.

बाहेर अंधार आणि पाऊस, दोन्हीही अहमहमिकेनें रौद्र स्वरूप धारण करीत होते.

---